






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

अंक ९९, १००

संपादक - रामचंद्र श्रीपाद जोग

वर्ष २४वे अंक ९९ एप्रिल - सप्टेंबर १९५१
वर्ष २४वे अंक १०० जानेवारी-मार्च १९५२

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या वतीने प्रकाशित होणारें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २४, अंक ९९ ] [ ओप्रिल-सप्टेंबर १९५१

# ९९









# नवीन सभासद

## तहहयात

१ श्री. वामन हरि दाते, अहमदाबाद ११
२ श्री. गोपाळ नारायण वैद्य, मुंबअी
३ श्री. श्रीधर वासुदेव सोहोनी, पाटणा.
४ प्रा. नारायण अनंत मावळंकर, सांगली.
५ श्री. स. वा. केळकर, मुंबअी ४
६ सौ. विजया मुळे, पाटणा.
७ श्री. वा. ल. चिपळूणकर, पुणें ४
८ शेठ गणेश बाबाजी आरवाडे, सांगली
९ श्री. सदाशिव रामचंद्र घारे, जमखिंडी.
१० श्री. अनंत काकबा प्रियोळकर, मुंबअी ४ ( घ. नि. ६ (८) प्रमाणें )
११ प्रा. नरहर रामचंद्र पारसनीस, ठाणें.
१२ श्री. गोविंद विठ्ठल सराफ, ठळकवाडी, बेळगांव

## साधारण

१ श्री. जगन्नाथ गंगाधर गाडगीळ, सोलापूर
२ श्री. माधव शंकर खळदकर, सासवड (पुणें)
३ श्री. भीमराव नारायण झेंड, आष्टी ( जि. बीड )
४ श्री. नरहर लक्ष्मण कुलकर्णी, आष्टी ( जि. बीड )
५ श्री. रामराव रंगराव देशपांडे, आष्टी ( जि. बीड )
६ श्री. भगवंत यशवंत पांडव, आष्टी ( जि. बीड )
७ श्री. दिगंबर विनायकराव काटेकर, आष्टी ( बीड )
८ श्री. महादेव कृष्णाजी साळवी, देहू ( जि. पुणें )
९ श्री. दत्तात्रय नारायण परांजपे, पुणें २
१० प्रा. सांब शंकर सुखटणकर, कोल्हापूर.
११ श्री. शंकर अवधूत पाठक, बार्शी (सोलापूर)
१२ श्री. सि. भा. कवी, सोलापूर
१३ श्री. रामचंद्र गणेश गोगटे, मुंबअी २
१४ श्री. भीमसेन पुरी, न्यू दिल्ली
१५ श्री. रामचंद्र श्रीधर फाटक, सांगली
१६ प्रा. मधुकर कृष्ण नाअीक, अहमदाबाद ६
१७ सौ. शान्ता अच्युत आगाशे, पुणें २
१८ कु. कुसुम रामचंद्र देव, अमळनेर
१९ श्री. वामन गणेश तळवलकर, किर्लोस्करवाडी
२० श्री. रामचंद्र व्यंकटेश देशपांडे, किर्लोस्करवाडी
२१ श्री. कुसुम गोपाळ पंडितराव, किर्लोस्करवाडी
२२ श्री. नागेश वामन भावे, किर्लोस्करवाडी
२३ श्री. राम गणेश मोघे, किर्लोस्करवाडी
२४ श्री. भास्कर दत्तात्रय सहस्रबुद्धे, किर्लोस्करवाडी
२५ श्री. बाळकृष्ण अनंत कोटणीस, बेळगांव
२६ सौ. अन्नपूर्णा दत्तात्रय चाफेकर, गदग
२७ राजकवि गोविंद झोकरकर, देवास
२८ श्री. प्रभाकर गोविंद घाटे, अिंदूर
२९ श्री. विठ्ठल महादेव चांदोरकर दादर,
३० श्री. भाअू कल्लाप्पा शहापुरे, शेडशाळ ( कोल्हापूर )
३१ श्री. मोरेश्वर श्रीधर भडकमकर, पुणें २
३२ श्री. वासुदेव कृष्ण कुलकर्णी, गिरगांव
३३ श्री. रा. य. रुद्राक्ष, नागपूर २
३४ कु. मालती किर्लोस्कर, पुणें ४
३५ श्री. राम सुधाकर पाटील, देगलूर ( जि. नांदेड )

[ यापुढील मजकूर कव्हर पान ३ वर पाहा. ]

महाराष्ट्र

साहित्य – पत्रिका

वर्ष २४, अंक ९९ ] [ ऑप्रिल–सप्टेंबर १९५१

## स्तंभ........

काळ्या पाषाणाचें मंदिर,
उंच तयाचें चित्रित गोपुर,
प्राकाराला सावरणारी
स्तंभ–मालिका विशाल गंभिर !

काळ्या घोटिव पाषाणावर
कंगोऱ्यांची नक्षी सुंदर,
उंच उभे हे स्तंभ हारिनें
ध्यानमग्न का कुणी मुनीश्वर !

उभ्या उभ्यानें हात जोडुनी
आंत देविचें क्षणभर दर्शन;
इथे परी या स्तंभांपाशीं
विसावतें तन–विसावतें मन !

कुणी गांजलें कष्टी जीवन
इथेच धावे आधाराला;
तसाच कोणी चंगीभंगी
इथे टेकतो ' बघावयाला '

इथे चालती वेत कुणाचे
मंगल आणिक दुष्ट अमंगळ !
भल्या बुऱ्या अन् भेटींचें ही
इथे असावें संकेतस्थळ !

अशी सदाची स्तंभापाशीं
रेंगाळावी अखंड वर्दळ
दर्प साहुनी तनू–मना वा
काळवंडलें पाषाणी दळ !

आणिक काळोखाच्या वेळीं
अवतीभवती नसतां कोणी
उसासती ते स्तंभ मनाशीं
गूढ नाद ये वातावरणीं !

" गेले भूपति, गेल्या संस्कृति,
काळ जातसे-मुळीं न बाकी
आहे मानव जिथल्या तेथे
माणुसकी तर अजून नवखी "!

—इंदिरा

अनुक्रमणिका



# आठशे वर्षांमागील अेक अज्ञात मराठी लेख

डॉ. शं. गो. तुळपुळे, ( पुणें विद्यापीठ )

प्रास्ताविक :—प्रस्तुत शिलालेख मागील वर्षी आंबेजोगाई येथे गेलों असतांना मिळाला. आंबें हा गांव ऐतिहासिक अवशेषांनी समृद्ध असून यादवकालीन हेमाडपंती देवळांचे अनेक प्रकार त्या गांवांत पहावयास सांपडतात. या देवळांतून आजपर्यंत एकूण चार शिलालेख उपलब्ध झालेले असून त्यांचें संपादन बर्जेस,[1] कीलहॉर्न[2] व खरे[3] या संशोधकांनी केलें आहे. या लेखां-वरून विशेषत: 'चौबारा' शिलालेखावरून आंबें गांवाचें यादवकालीन वैभव अजमावितां येतें. 'चौबारा' लेखांत आंबें गांवास प्रकाशमान, जनपदव्याप्त, उपवनभूषित, इत्यादि पदांनी गौरविलें असून त्यांतील गंगनचुंबी मंदिरांचा, प्रासादांचा व त्यांवर डौलाने डोलणाऱ्या पताकांचा, कुंकुमसंमार्जनाचा, उत्फुल्ल कमलांचा व सौरभयुक्त वायूचा, याप्रमाणे संपन्नतेचे द्योतक असे कितीतरी उल्लेख या वर्णनांत आले आहेत. साहजिकच अपेक्षा अशी होती की या गांवांत आणखी कांही शिलालेख मिळावे व त्याप्रमाणे ते मिळाले. एक हल्ली संगीत मशीद या नांवाने ओळखल्या जागाऱ्या पूर्वकालीन आदित्याच्या देवळांत व दुसरा जोगाईचें माहेर या नांवाने प्रसिद्ध असलेल्या हत्तीखाना लेण्यांत मिळाला. पैकी संगीत मशिदींतील लेखाचा अर्धा भाग अद्यापि अनुपलब्ध असल्याने तूर्त हत्तीखान्यांतील शिलालेखाचेंच तेवढें संपादन करीत आहें. या कामीं डॉ. मो. गं. दीक्षित व डॉ. रा. ना. दांडेकर यांच्या साहाय्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें जरूर आहे.

ग्रामनाम :—या संपादनाच्या निमित्ताने आंबें या गांवाच्या मूळ नांवाविषयी चर्चा करणें अगत्याचें वाटतें. या गांवाचें हल्लीचें नांव मोमिनाबाद असें असून प्राचीन शिलालेखांतून तें आम्रपुर या नांवाने उल्लेखिलेलें आढळतें. आंबें येथेच उपलब्ध असलेल्या 'योगेश्वरी-माहात्म्य[4]' या संस्कृत काव्याच्या सर्व हस्तलिखित प्रतींतून गांवाचा उल्लेख जयन्तिका किंवा जयन्ती नगरी ह्याप्रमाणे केलेला असला तरी तें त्याचें खरें नांव दिसत नाही. कारण त्याच ग्रंथांत गांवास 'अंब-क्षेत्र' असेंहि म्हटलेलें आहे ! अर्थात जयन्तपाळ किंवा जैतपाळ या राजाच्या नांवा-वरून कवीने गांवास जयन्तिका नगरी म्हणणें शक्य आहे. आंबें येथे उपलब्ध झालेल्या 'चौबारा' शिलालेखांत[5] ग्रामनामाचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे.

> " यस्य चां ( चा ) म्र ( म्र ) पुरं द्योतं न ( न ) गरं भूषणं भुवः ।
> नानाजनपदाकीर्णं नानारामोपशोभितं ॥ ५ ॥ "

---

१ Arch. Survey of India, Vol. III, pp. 85-92
२ Epigraphia Indica, Vol. VII
३ दक्षिणच्या मध्ययुगीन अितिहासाचीं साधनें, खंड, १-२-३
४ योगेश्वरी-माहात्म्य, अ. २२, श्लो. ७९.
५ ग. ह. खरे: द. म. इ. साधनें, खं. १, पृ. ७२

चौबारा शिलालेखांतील ' आम्रपुर ' हें ग्रामनामहि कृत्रिमच दिसतें. आंबें या देशी नांवाचें तें संस्कृतीकरण असावें. आंवें गांवांतील ' सकळेश्वर ' शिलालेखांतील[1] मराठी मजकुरांतहि 'आंत्र (म्र) देश' असा उल्लेख आढळतो. येथेहि पुनः संस्कृतीकरणच झालेलें दिसतें. कारण हा शिलालेख शके ११५० मधील असून त्यानंतर सुमारे पन्नास वर्षांनी म्हणजे शके १२०० च्या सुमारास रचिल्या गेलेल्या ' लीळाचरित्र ' या महानुभावीय गद्य ग्रंथांत[2] याच गांवाचा उल्लेख ' आंबें '–खोलनाएकाचें आंबें–असा येतो. ज्याच्या नांवाने हें गांव त्या काळीं ओळखलें जाई त्या खोलनायकाच्या किंवा खोलेश्वराच्या मठांतील शिलालेखांत[3] मात्र गांवास आम्रपुर म्हटलें आहे. तात्पर्य, आंबें हें या गांवाचें नांव असून संस्कृत शिलालेखांतून त्याचें कृत्रिम रीतीने बनविलेलें संस्कृत रूप वापरलें जाई. मराठी ग्रंथांतून मात्र मूळ नांव येई. असो. गांवची देवी प्रसिद्ध असून तिच्या नांवाचा समावेशहि ग्रामनामांत झालेला दिसतो. मात्र आंबें हें गांवाचें नांव अंबा ( म्ह. देवी ) या शब्दावरून सिद्ध होण्याची शक्यता फार कमी आहे. कारण तसें असतें तर ' अंब्याची जोगाई ' किंवा ' जोगाईचें आंबें ' यांसारखे द्विरुक्तिदोषयुक्त शब्दप्रयोग रूढ झाले नसते. आंबें म्हणजेच जर अंबेचें किंवा देवीचें गांव तर मग पुनः अंब्याची जोगाई असें म्हणण्यांत स्वारस्य काय ? शिवाय उपरिनिर्दिष्ट शिलालेखांतील संस्कृत मजकुरांतून या गांवाच्या नांवाचें जें संस्कृत रूप आढळतें तें आम्रपुर असें आहे, अंबापुर असें नाही. अंबा ( म्ह. देवी ) या शब्दावरून जर गांवास नांव पडतें तर वरील शिलालिखितांची रचना करण्याऱ्या लेखकांनी त्या शब्दाचें संस्कृत रूप अंबापुर असें केलें असतें. परंतु तसें तें झालेलें नाही. त्याचप्रमाणें सकळेश्वर–शिलालेखांतील मराठी मजकुरांत ' आम्रदेशे लघुवाडधी नाम ग्रामो दत्तः ' असा जो उल्लेख येतो. त्यांतील आम्रदेश या शब्दप्रयोगास महत्त्व आहे. कारण या शब्दाने आंबें हें गांव सूचित होत नसून त्या गांवाच्या सभोवतीच्या पांचपंचवीस कोसांतील टापू सूचित होत आहे. याच लेखांतील यापुढील वाक्यांत तर ' आंबे देशे ' असा मराठींतील देशनामाचा स्पष्टच उल्लेख आहे. ही झाली यादवकालांतील परिस्थिति. पुढे मुसलमानी अमदानींतहि आंबें किंवा मोमिनाबाद हा एक परगणा किंवा विषय धरला जाई. याचा अर्थ आम्रदेश शब्द प्रांतवाचक असून तो अंबा ( देवी ) या शब्दावरून रूढ होणें असंभवनीय आहे. आंबें आणि अंबा या दोन शब्दांत अतिसाम्य असल्यामुळे क्वचित् कोठे त्यावर श्लेष साधून तें एकाच अर्थाने योजिल्याचें मात्र दिसून येतें. उदाहरणार्थ, ज्याचें संपादन मी पुढे करीत आहे, त्या जोगाईच्या माहेरांतील शिलालेखांत ' अंबासमाधिष्ठित' असा स्थलोल्लेख आढळतो. आता यांतील अंबा हें पद श्लिष्ट असून त्यामुळे एकंदर शब्दाचे ' अंबेच्या म्हणजे देवीच्या देशाचा अधिष्ठाता ' व आंब्र नामक देशाचा अधिष्टाता ' याप्रमाणें दोन अर्थ होऊं शकतात. वरील श्लेष सुंदर असला तरी त्यामुळे मूळ ग्रामनामाचा शोध घेण्याच्या मार्गांत थोडा घोटाळा उत्पन्न होतो हें मान्य करावेंच लागेल. असो.

तात्पर्य हें गांव व त्याच्या भोवतालचा प्रदेश पूर्वीपासूनच आंबें या नांवाने ओळखला जाई यांत कांही शंका नाही. यादवकालांत या गांवास ' खोल्नायकाचें आंबें ' असें म्हणत.

---

१ ग. ह. खरे: द. म. इ. साधनें, खं १, पृ. ६५

२ लीळाचरित्र, एकांक, क्र. १२ ( संपा. ह. ना. नेने )

३ Burgess : Arch. Survey of W. India, Vol. III, pp. 85-92.

कारण सिंघण यादवाचा सेनापति खोलेश्वर याचा मुक्काम आंबें येथे असे व तो आपल्या शौर्यादि गुणांमुळे इतका प्रसिद्धीस आला होता की गांवास त्याचेंच नांव पडून गेलें होतें. अजूनहि या गांवांत एक खोलेश्वराचा मठ असून त्यांत शके ११६२ मध्ये खोदलेला खोळेश्वर-प्रशस्तिपर असा एक शिलालेखहि आहे. पुढे कालांतराने खोलेश्वराचें नांव लोकांच्या स्मरणांतून गेलें, व गांवांतील योगेश्वरी किंवा जोगाई या देवीवरून 'जोगाईचें आंबें' हा शब्द-प्रयोग रूढ होऊन बसला.

प्राप्तिस्थल :— प्रस्तुत शिलालेख आंबें गांवांतील जोगाईचें माहेर किंवा जोगाईचा सभामंडप या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या एका लेण्यांत मिळाला. हें शिवलेणें[1] गांवाच्या बाहेर वायव्य दिशेस मुकुंदराजाच्या समाधिस्थानाच्या वाटेवरच, पण थोडें बाजूस असून जोगाईचें मुख्य देऊळ व हें शिवलेणें यांतील अंतर फार तर दीड दोन फर्लांग असावें. हें लेणें एका भुईसपाट खडकांत खोदलेलें असून आकाराने तें विस्तृत आहे. लेण्यापुढील प्रांगणांत म्हणजे मोकळ्या जागेंत चारी बाजूंस चार दगडी हत्ती उभे असून त्यांतील प्रत्येक हत्तीचा घेर २३ फूट असून लांबी १२ फूट आहे. या प्रांगणाच्या मध्यभागीं नंदीचा चबुतरा असून त्यावर चौखांबावर आधारलेली मेघडंबरी आहे. मुख्य शिवलेणें या चबुतऱ्याच्या बरोबर समोर येतें. लेण्याची लांबी ९१ फूट व खोली ४५ फूट असून त्यावरील दगडी छप्पर बत्तीस खांबा-वर आधारलेलें आहे. लेण्याच्या मागील म्हणजे उत्तरेकडील भिंतींत गणेश, सप्तमातृका, शिवाचें तांडवध्यान व पार्वती यांच्या आकृति खोदलेल्या असून मध्यवर्ति गाभाऱ्यांत आता अगदी अस्पष्ट होऊन गेलेली त्रिमूर्तीची आकृति आहे. या लेण्यांतील बत्तीसखांबी सभामंडपांत प्रस्तुत लेख असलेली शिळा धुळींत पडलेली आहे. गेलीं बरींच वर्षें या शिवलेण्याचा अर्धाअधिक भाग जमिनींत गाडला गेलेला असल्याने त्यांतील शिलालेखाचा पत्ता कोणास नव्हता. इ. स. १८७५–७६ मध्ये आंबें–जोगाईस जाऊन या लेण्याचें तपशीलवार वर्णन करणारा जेम्स बर्जेस् त्याच लेण्यांत पडलेल्या शिलालेखाचा नुसता उल्लेखहि करीत नाही. अर्थात् त्या वेळीं लेख जमिनींत गाडला गेला असल्यामुळे बर्जेस् यास तो अज्ञातच असावा. पुढे इ. स. १९३० मध्ये आंबें गांवांतील चार शिलालेखांची सविस्तर माहिती देणारे संशोधक श्री. ग. ह. खरे यांनाहि प्रस्तुत लेख उपलब्ध झाल्याचें दिसत नाही. कारण तेव्हाहि तो भूमिगतच होता. त्याचा अज्ञातवास संपण्याचें श्रेय अप्रत्यक्ष रीत्या निजामचे सध्याचे युवराज यांजकडे जातें. हे युवराज कांही वर्षांपूर्वी आंबें येथे आले असतांना त्यांच्या भेटीच्या निमित्ताने निजाम सरकारच्या पुराणवस्तु-संरक्षण खात्याने जमिनींत गाडलें गेलेलें हें लेणें त्यांतील माती उकरून साफ केलें. व तेव्हा प्रस्तुत शिलालेखास, कदाचित् कांही शतकें लोटल्यानंतर सूर्यप्रकाश दिसला. याहि गोष्टीस आता सात आठ वर्षें होऊन गेलीं. पण आश्चर्य हें, की या अवधींत कोणाचेंहि लक्ष या शिलालेखाकडे गेलें नाही. म्हणजे एका दृष्टीने त्याचा अज्ञातवास चालूच राहिला.

वर्णनः—प्रस्तुत लेख ज्या शिलेवर खोदलेला आहे, ती शिला ४ फूट लांब व १ फूट रुंद असून ती सभामंडपाच्या मध्यभागीं जमिनीवर आडवी पडलेली आहे. मूलतः ती कोठे बसविलेली असावी हें कळण्यास कांही मार्ग नाही. शिला घोटीव दगडाची असून तिच्या-

१ सोबत छायाचित्र आहे.

वरील लेखाची लांबी १ फूट ४ इंच व रुंदी १ फूट आहे. शिला व लेख दोनहि उत्तम स्थितींत आहेत. फूटतूट कोठेहि झालेली नाही. शिलेच्या माथ्यावर चंद्रसूर्य खोदलेले असून त्याखाली तेरा ओळींचा लेख आहे.

अक्षरवटिकाः—प्रस्तुत लेखांतील लिपि दक्षिणी वळणाची बाराव्या शतकांतील नागरी आहे. लेखांत पृष्ठमात्रेचा उपयोग बहुतेक ठिकाणीं केल्याचें दिसतें. बहुतेक म्हणण्याचें कारण असें की, यांस कांही अपवाद आहेत. उदाहरणार्थ, ४ थ्या ओळींतील 'महामंडलेश्वर' ९ व्या ओळींतील 'डो' व 'फेडी' आणि १० व्या ओळींतील 'योगिनींचा' या चार शब्दांतील जाड ठशांत छापलेल्या अक्षरांवर पृष्ठमात्रा नसून शिरोमात्रा आहेत. याच्या उलट पृष्ठमात्रेचा वापर एकूण २३ ठिकाणीं केलेला आढळतो. पैकी ८ व्या ओळींतील 'कुंभैपर्ली' आणि 'वैल' या दोन शब्दांतील जाड ठशांत छापलेल्या अक्षरांत पृष्ठमात्रा व शिरोमात्रा या दोहींचा संयुक्त उपयोग केलेला आहे. हे दोन शब्द अनुक्रमें 'कुंभेपर्ली' व 'वेल' असे लिहिलेले आढळतात. कारण उघड आहे. 'भै' व 'वै' हे वर्ण संयुक्त स्वरयुक्त आहेत व त्यांचें लेखन पृष्ठमात्रा-पद्धतीने करावयाचें म्हणजे 'व' या अक्षराच्या मागे दोन मात्रा द्याव्या लागतात. तसें केल्यास लेखनांत एकापुढे एक असे उभे दंड फार येत असल्याने दुर्गम होण्याची भीति असल्यामुळे प्रस्तुत लेखकाने 'भै' व 'वै' या अक्षरांवरील दोन मात्रांची व्यवस्था एक पृष्ठमात्रा व एक शिरोमात्रा याप्रमाणे लावली आहे. तात्पर्य, तेरा ओळींच्या या लेखांत २१ शुद्ध पृष्ठमात्रा, ४ शुद्ध शिरोमात्रा व २ शिरो-पृष्ठ अशा संयुक्त मात्रा याप्रमाणे एकूण २७ मात्रांचा हिशेब आहे. यावरून बाराव्या शतकांतील लेखनपद्धतीची कांही कल्पना येऊन पृष्ठमात्रेचा वापर शिरोमात्रेच्या मानाने किती अधिक प्रमाणांत होता हें कळण्यास मदत होईल.

लेखनः—प्रस्तुत शिलालेखाचा लेखक त्यांतील लेखनपद्धतीवरून चांगला सुसंस्कृत असावा असें वाटतें. 'संवत्सरांतर्ग्गतं' (ओळ, १) व 'निवर्त्तनें' (ओळ, ६) या दोन शब्दांतील अनुक्रमें ग्ग व र्त्त या वर्णांचें द्वित्व अनावश्यक असलें तरी यादव-कालांतील बहुतेक सर्व शिलालेखांतून रफारयुक्त वर्ण द्वित्त लिहिलेला आढळतो हें ध्यानीं घेतलें असतां वरील रूपें अशुद्ध वाटणार नाहीत. १२ व्या ओळींतील 'हरेतु' व 'वसुधरा' हीं दोन रूपें मात्र उघडच अशुद्ध आहेत. क्वचित् 'भुमि' (ओळ, ७) या सारख्या एखाद्या रूपांत ऱ्हस्वदीर्घाची ओढाताणहि दिसते. पण स्थूलमानाने पाहतां लेखन शुद्ध आहे असें म्हणण्यास हरकत नाही. एका ठिकाणीं मात्र लेखकाच्या हातून अनवधानाने द्विरुक्ति झाली आहे. ४ थ्या ओळींत 'महामंडलेश्वर उद उदयादित्यदेवेन' या मजकुरांतील 'उद' हीं अक्षरें केवळ नजरचुकीमुळे दोनदा लिहिलीं गेलीं आहेत.

कालः— लेखाच्या पहिल्याच ओळींत 'संवतु १०६६ रक्ताक्षीसंवत्सरांतर्गत अश्विन शुद्ध १ गुरुदिने' याप्रमाणे कालोल्लेख असून कालगणनेप्रमाणे तो बरोबर आहे. मात्र शक गत नसून चालू शक दिलेला आहे. हा काल इंग्रजी पद्धतीप्रमाणे ३१ ऑगस्ट ११४४ इ. स. असा येतो. म्हणजे हा शिलालेख खोदला जाऊन आज आठशे वर्षे होऊन गेलीं.

याच्या पूर्वीचे असे सहाच[1] लेख उपलब्ध असून " त्यांतील श्रवणबेळगोळ व सितावर्डी हे दोन लेख मराठी वळणाच्या शब्दांच्या दृष्टीने फारच त्रोटक आहेत. प्रस्तुत शिलालेखांत आठशे वर्षांमागील मराठी भाषेंत सुमारें सहा ओळींचा व पांचपंचवीस शब्दांचा मजकूर अभंग व अखंड मिळतो हें त्याचें एक माहात्म्य होय.

भाषाः— प्रस्तुत लेखाची भाषा अर्ध-संस्कृत व अर्ध-मराठी अशी संमिश्र आहे. पहिल्या चार व शेवटल्या साडेतीन ओळींतील मजकूर शुद्ध संस्कृत भाषेंत असून ५ व्या ओळीपासून १० व्या ओळीच्या मध्यापर्यंतचा मजकूर मराठींत आहे. पैकी मराठी भागांतील ' नाथा ' ( चतुर्थी ए. व. ) ' राडिए ' ( सप्तमी ए. व. ) ' दांडेयांचीं ' ( चान्त षष्ठी ) ' नाथपूजितेआ पुजारेआ ' ( विशेष्यनिघ्न विशेषण ) व ' तेला ' ( षष्ठी ए. व. ) हीं रूपें व्याकरणदृष्ट्या महत्त्वाचीं आहेत. तसेंच ' कामतु, ' ' सालिवण , ' ' दांडा, ' ' निवर्तन, ' ' मान्य, ' ' डो, ' ' हाट, ' ' कवडा, ' व ' फूलासरी ' हे मराठी मजकुरांतील शब्द कोशदृष्ट्या महत्त्वाचे आहेत. यांतील बरेच शब्द यादवकाळांतील महानुभावीय महाग्रंथांतून आढळतात. लेखांतील संस्कृत भागांतहि क्वचित् ' संवतु ' ( १ ) यासारखें एकादें मराठी वळणाचें उकारान्त रूप येतें हें विशेष होय.

विषयः— शके १०६६ आश्विन शुद्ध प्रतिपदेस गुरुवारीं आंत्रदेशाचा अधिष्ठाता महामंडलेश्वर उदयादित्यदेव याने नाथाच्या म्हणजे शिवाच्या देवळाच्या योगक्षेमासाठी जें वृत्तिपत्र केलें, त्याचें शासन हा प्रस्तुत शिलालेखाचा विषय आहे. श्रीभूचरनाथाचा म्हणजे शिवाचा पादपंकजभ्रमर असा जो श्रीरत्नदेव त्याचा हा उदयादित्यदेव भक्त असून आपल्या गुरूचा म्हणजे श्रीरत्नदेवाच्या ठिकाणीं तो चरणाराधनतत्पर असल्याचेंहि लेखांत म्हटलें आहे. या उदयादित्यदेवाने भूचरनाथाच्या योगक्षेमासाठी म्हणून परमभक्तीने सेलू नांवाच्या गांवांतून वीस गद्याण, काम नांवाच्या जमिनीपैकीं बारा गद्याण, राडी नांवाच्या गांवांतील भातशेता-पैकी काठीच्या मापाने मोजलेलीं तीन निवर्तनें, व सिंघणदेवाच्या जवळगांवांतील जमीन इतकें दान दिलें आहे. तसेंच भूचरनाथाची पूजा करणाऱ्या पुजाऱ्यासहि त्याने बारा गद्याण, कुंभेफळ नांवाच्या गांवांतील पांच गद्याणाची जमीन तळ गांवांतून चांगल्यापैकी पसतीस बैल, गांवांतील प्रत्येक घाण्यामागे तेलाचें एक पात्र, दर हाटामागे एक कवडा, फुलांची एक माळ व एक मळा याप्रमाणे वृत्ति करून दिली आहे. हें शासन जो कोणी नष्ट वा लुप्त करील त्यावर योगि-नींचा वज्रदंड पडेल ही शपथ व एतत्सम शासनलेखांच्या शेवटीं नेहमी येणारे दोन श्लोक खोदून हें शिलालिखित पूर्ण केलें आहे.

वरील लेखांतील आंत्रप्रांतस्थ महामंडलेश्वर उदयादित्यदेव व त्याचा गुरु रत्नदेव यांज-विषयी अधिक संशोधन होणें अवश्य आहे.

---

१. श्रवणबेळगोळ ( शके ९०५ ); दिवें-आगर ताम्र० ( शके ९८२ ); भोर ताम्र० ( शके १००१ ); सितावर्डी ( शके १००८ ); मंगळवेढें ( शके १०५४ ); व चांजे ( शके १०६० )

# शिलालेख

ओळ

१. ॐ ॥ स्वस्ति संवतु[1] १०६६ रक्ताक्षी संवत्सरांतर्गतं[2] अश्विन

२. शुद्ध १ गुरुदिने अद्येह श्रीभूचरनाथ[3]पादपंकजभ्रम

३. र श्रीरत्नदेवः गुरु[4]श्चरणाराधनतत्परः अंबासमाधिष्ठि

४. तं महामंडलेश्वर उद[6]उदयादित्यदेवेन परमभक्त्या ना

५. थ[7] काम[8]तु सेलुग्रामीं[9] गं[10] २० तथा कामाख्ये[11] भूमि ग १२

---

१. यादवकालीन लेखांतून संवताचा उल्लेख असला तरी वास्तविक तो शकोल्लेखच असतो.

२. अनुस्वार अनावश्यक.

३. शिव, शंकर.

४. गुरुचरणाराधन—असें पाहिजे.

५. या शब्दसमूहाचे तीन निरनिराळे अर्थ होऊं शकतात (१) अंबा—समाधि—ष्ठित (स्थित). म्हणजे अंबेची जेथे समाधि (लय,विश्रांति) आहे अशा ठिकाणीं, अर्थात् आंबे--जोगाई येथे राहणारा. हा अर्थ स्वीकारण्यांत एक अडचण अशी की, समाधि या शब्दाचा रूढार्थ न घेतां विश्रांति असा दूरान्वित अर्थ करावा लागतो. दुसरें अर्से कीं स्थित याचें ष्ठित हें रूप प्रस्तुत ठिकाणीं तरी अशुद्ध आहे. कारण मागे अ किंवा आ याशिवाय इतर स्वर घातल्यास स्थि >ष्ठि अशी प्रक्रिया होईल हें खरें असलें तरी ही प्रक्रिया मागे उपपद असतांनाच तेवढी होते. (२) अंबा--समधिष्ठित असा पाठ घेतल्यास 'अंबा ही ज्यावरील अधिष्ठात्री देवता आहे असा महामंडलेश्वर, असा अर्थ होईल. पण मूळ लेखांत म नसून मा स्पष्ट आहे. ( ३ ) अंबा--सम--अधिष्ठित अशी फोड केल्यास अर्थ अंबेच्या म्हणजे जोगाईच्या प्रांताचा (सम=प्रांत, टापू) आधिष्ठाता महामंडलेश्वर इ. याप्रमाणे अर्थ होईल. हा अर्थ मान्य केल्यास अंबासमाधिष्ठित हें उदयादित्यदेवाचें विशेषण ठरतें व त्यांतून आंबदेशहि सूचित होतो.

६. येथे 'उद' हीं दोन अक्षरें अनवधानाने दोनदा लिहिलीं गेलीं आहेत. उदयादित्यदेव हें राजाचें नांव आहे.

७. 'नाथ' याचें चतुर्थीचें ए. व.

८. 'कामतु' (<सं. कर्मस्थान...?) हा शब्द ज्ञानेश्वरींत 'कामठा' (ज्ञा. १८-३५८) व महानुभावीय ग्रंथांपैकी लीळाचरित्रांत 'कामठ' (पूर्वार्ध, क्र. २३७, २४०, २८५) या रूपांत आढळतो. तसेंच तो 'कामत-तु' या रूपाने शके १२११ मधील उनकेश्वर शिलालेख, शके ११५० तील आंबे–जोगाई येथील सकळेश्वराचा शिलालेख व शके ११२८ तील पाटणशिलालेख या लेखांतूनही आढळतो. शब्दाच्या अर्थच्छटा संदर्भानुसार भिन्न भिन्न आहेत.

९. आंबे गांवाजवळील सेलू नांवाचें गांव.

१०. गद्याण नांवाचें सोन्याचें नाणें.

११. कांम नांवाची जमीन.

६. राडिए[12] सालिवर्णं[13] दांडेआर्ची[14] निवर्त्तनें[15] ३ सिंघणदेवां[16]
७. जवलग्रामीं[17] भुमि दत्त नाथपूजितेआ पुजारेआं[18] ग १२
८. कुंभेपलीं[19] भूमि ग ५ तलिं[20] मान्ये[21] वैल ३५ घाणआप्राति[22]
९. तेला डो[23] १ हांटंप्रति[24] कवडें[25] १ फूलासरी[26] १ मलें[27] १ जो फेडी
१०. लोपी तेआ योगिनींचों[29] वज्रदंडु पडे ॥ वहुभिर्वसुधा भुक्ता
११. राजभिः सगरादिभिः । यस्य यस्य यदा भूमिः तस्य तस्य
१२. तदा फलम् ॥ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेतु वसूधरां[30] । षष्टिं वर्ष
१३. सहस्राणि विष्ठायां जायते कृमिः ॥ इति शुभं ॥

---

१२. राडी नांवाचें गांव त्याचें सप्तमीचें ए. व.

१३. भाताचें शेत. ( <सं. शालि--वन )

१४. 'दांडा' = काठी

१५. निवर्तन हें एक जमीन मोजण्याचें प्रमाण आहे. ( A measure of land 20 rods *or* 200 cubits or 40,000 Hastas square, Monier Williams—संस्कृत कोश, पृ. ५६० ). "दांडेआर्ची निवर्तनें" म्हणजे काठीच्या मापानें मोजलेलीं निवर्तनें.

१६. सिंघणदेव यादव.

१७. हल्लींचें जवळगांव.

१८. श्रीभूचरनाथाची पूजा करणाऱ्या पुजाऱ्यासाठी. 'नाथपूजितेआ' हें विशेष्यनिघ्न विशेषण उल्लेखनीय आहे.

१९. हल्लींचें कुंभेफळ.

२०. तळ नांवाचें गांव. हीं सर्व गांवें आंबे गांवाच्या आसपास विद्यमान आहेत.

२१. उत्तम प्रतीचे; चांगले.

२२. 'घाणेआप्रति' असें पाहिजे. प्रत्येक घाण्यामागे.

२३. डो ( < सं दर्वि =A wooden ladle < सं. द्रु =Wood )= तेल काढण्याचें नारळाच्या करवंटीचें पात्र. हा शब्द याच स्वरूपांत लीळाचरित्र, पूर्वार्ध क्र. ३५०, ३५५ व उत्तरार्ध १६६, ४८८ या ठिकाणींहि येतो.

२४. दर बाजारा ( दुकाना ) मागे एक.

२५. कवड = एक नाणें ( पहा--लीळाचरित्र, एकांक १३, पूर्वार्ध २१७, उत्तरार्ध, ३८, ९९; दृष्टान्तपाठ, ६१; स्मृतिस्थळ, ५० )

२६. फुलांची सरी म्हणजे माळ.

२७. मळा.

२८. फेडणें = नाहींसें करणें; नष्ट करणें ( पहा—दृष्टान्तपाठ, ५४ ).

२९. अष्ट योगिनी. ( जोगाई नव्हे. )

३०. वसुंधरां असें पाहिजे.

---

अनुक्रमणिका

# टिळक तलावावर

(लेखक अ. ज. करंदीकर)

एके वर्षी पोहण्याचे दिवस संपत आले असतांना मीं प्रकाशला म्हटलें, 'यापुढे आपली गांठ पडायची नाही,' तेव्हा त्याने उत्तर दिलें. ' Henceforth we shall meet in business. ' पण प्रकाशच्या कल्पनेप्रमाणे त्याची आणि माझी एरवींच्या व्यवहारांत गांठ पडणें अशक्यच होतें. हाच नियम माझ्या तळ्यावरील बहुतेक साऱ्या परिचितांना लागू पडतो असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. यामुळे तळ्यावर भेटणाऱ्या साऱ्या व्यक्ति माझ्या दृष्टीने एक प्रकारें काल्पनिक व्यक्तीच बनून जातात. इतकेंच काय, पण कित्येकदा उन्हाळा संपेपर्यंत एकत्र पोहूनहि मी ज्यांच्याबरोबर पोहत होतों, त्यांचीं नांवेंसुद्धा मला अज्ञात राहून जातात. अशाच एका संतरणबंधूने एके रात्रीं मला 'सरस्वतीविलास' पाशीं हटकलें. त्या वर्षीं हा तरतरीत तरुण आमच्या बरोबर पोहत असतांना त्याच्या बहिणीने शल्यतंत्रप्रवीण आयुर्विद्या-विशारदांच्या साहाय्याने त्याचें रक्त आपल्या रक्तहीन शरीरांत शोषून घेतलें. त्यामुळे तेजोहीन झालेला हा तरुण पोहण्याची वासना अतृप्त राहिलेल्या प्रेतात्म्यासारखा फटफटीत होऊन चार दिवस नुसताच तळ्यावर येऊन बसत असे. सरतेशेवटीं अन्य जनांच्या संतरणकडेचे अतृप्त नेत्रांनी अवलोकन करणें असह्य होऊन त्याने स्वतःची प्रकृति पुरती सुधारण्याची वाट न पाहतांच पाण्यांत उडी टाकली. पण या वैयक्तिक गोष्टी बोलतांनासुद्धा मीं कधी त्याचें नांव विचारून घेतलें नाही.

या माझ्या अलिप्तपणामुळे तलावावरील जीवन मला नुसतें काल्पनिकच नव्हे, तर कांही अंशीं रंगभूमीवरील जीवनासारखेंच भासतें. त्यांत प्रभेद इतकाच की रंगभूमीवरील नटनटी 'ग्रीनरूम' मध्ये अर्थात् हिरव्या महालांत वेषांतर करून मग रंगभूमीवर येतात; त्याच्या उलट टिळक–तलावावरील नटनटी आधी वेषांतर करून मग तलावाच्या हिरव्या महालांत प्रवेश करतात. रंगभूमीप्रमाणेच टिळकतलावावर वृद्ध आणि प्रौढ अगदी अल्पसंख्य असतात. ऑस्ट्रेलियाला जाण्यापूर्वी आपल्या पुत्रीपौत्रीसह केव्हा केव्हा पोहायला येणाऱ्या रँग्लर परांजप्यांच्याप्रमाणे तळ्यावर वर्तमान, भूत आणि भविष्य यांचा संयुक्त साक्षात्कार घडविणारे लोक थोडेच. यामुळे पोहायला जातांना मला नेहमी दुहेरी आनंद वाटत असतो. एक पोहण्याचा आनंद आणि दुसरा टेकडीवरील वृद्धांना टाळण्याचा आनंद. हा आनंद व्यक्त करतांना मनाला संकोचसुद्धा वाटत नाही. कारण टेकडीवर भेटणारे वृद्ध समाजाचे कितीहि उपयुक्त घटक असले तरी त्यांच्याशीं संबंध न ठेवणें हें सौंदर्योपासकाचें पहिलें कर्तव्य आहे. कोणीं कुत्सितपणाने म्हणतील की शेवाळांत डुंबायला चाललेल्यांनी सौंदर्योपासनेचें नांव सुद्धा घेऊं नये. पण वास्तविक पाहतां सौंदर्याचा आणि शेवाळाचा अगदी निकटचा संबंध आहे. कारण कमलाचा आणि त्या कमलालाहि शोभा देणाऱ्या कमलाननेचा जन्म शैवालयुक्त जलांतच होतो. मात्र तळ्यावरील सौंदर्योपासनेचीं उपकरणें थोडीं चमत्कारिक असतात हें मान्य केलेंच पाहिजे. लहानपणीं सुशी एक गाणें म्हणत असे–किती–मजेदार। हल्लीं स्त्रियांचा शृंगार-पण तिच्या गाण्यांत सुद्धा डोक्याला रबरी कानटोप्या, पाठीला बांधलेले डबे, भोपळे, लाकडी ठोकळे, नारळ, फुगे इत्यादि टिळक तलावावरील अलंकारांचा उल्लेख येत नसे. असल्या

अलंकारांनी विभूषित झालेल्या आणि गळ्यांत एकांवलीऐवजी मोटारीची धाव अडकविलेल्या सुंदरींना पाहून ' जातीच्या सुंदरांना कांहीहि शोभतें, ' या सिद्धांताची सत्यता मनाला पटल्यावाचून राहणार नाही.

हें सारें खरें असलें तरी जलक्रीडेचें सर्वोत्कृष्ट वर्णन करणाऱ्या माघ कवीच्या मासांतच आम्ही प्रथम संतरणाचा उपक्रम करतों, तो मुख्यतः हेमंतसमाप्तीनंतर टेकडी चढण्यापेक्षा पाण्यावर लोळण घेणें अधिक सुखावह होऊं लागल्यामुळेच होय. माघामधल्या आमच्या जलक्रीडामंदिराच्या वार्षिक उद्घाटनाला सामान्यतः सारे पुरुषच येतात. तेव्हा तलावावर ठिकठिकाणीं लावलेल्या ' केवळ स्त्रियांसाठी ' या पाट्यांना कांहीच अर्थ नसतो. त्यामुळे तलावावर त्या दिवसांत ईव्हच्या उत्पत्तीपूर्वीच्या नंदनवनाचीच मला आठवण होते. पुढे चैत्राच्या सुमारास ईव्हच्या आधुनिक अवतारांचा तलावावर संचार चालू होतो आणि तेव्हापासून तिथले राखींव भाग त्यांना तोडून द्यावे लागतात. ॲडामने स्त्रीच्या साहचर्याची इच्छा प्रकट केली, तेव्हा देवाने त्याच्या कांही बरगड्या कापून घेऊन त्यांच्या विनिमयांत त्याला ईव्ह दिली. त्या मानानें टिळक—तलावावरील तरुणांना तरुणींच्या साहचर्यासाठी अगदीच अत्यल्प त्याग करावा लागतो. प्रथम पुरुषाच्या बरगड्यांपासून स्त्रीची उत्पत्ति झाल्याची कथा अनेक अर्वाचीन वाचकांना अगदीच रानवट वाटेल. अशा सुसंस्कृत व्यक्तींना कदाचित् अमरूच्या पुढील श्लोकार्धातील कल्पना अधिक रुचेल.

पुराभूदस्माकं प्रथममविभिन्ना तनुरियम् ।
ततोऽनु त्वं प्रेयान् वयमपि हताशाः प्रियतमाः ।।

पण अद्वैती अमरु म्हणतो, त्याप्रमाणे नरनारींच्या विभक्तीकरणानंतर लगेच कांही मानव आनंदनंदनांतून निर्वासित होत नाही. हें निर्वासन वस्तुतः मुलांच्या आगमनाने होतें. याचा अनुभव आम्हांला तळ्यावर फारच चांगला येतो. फाल्गुनांत सामान्यतः पुरुषांकडून वापरल्या जाणाऱ्या तळ्यांत चैत्राच्या सुमारास रमणींनी प्रवेश केला की वैशाखांत सारेंच तळें मुलांकडून व्यापलें जातें. प्रतिवर्षी वैशाखांत टिळक—तलावावर बालवीरांचें आणि बालावीरांचें सामुदायिक आक्रमणच होतें. हें आक्रमण एकदा चालू झालें की नेहमी पोहायला येणाऱ्यांनाहि त्या दिवसांत तळें वर्ज करावेसें वाटूं लागतें. पण बालवीरांच्या उपद्रवापेक्षाहि उन्हाळ्याचा उपद्रव मला अधिक असह्य होत असल्यामुळे त्या वाटण्याप्रमाणे वर्तन करतां येत नाही. मी पोहायला प्रारंभ केला, त्या वर्षी प्रथमच या बालवीरांच्या टोळ्यांमागून टोळ्या तळ्याकडे येत असलेल्या पाहून मला तर असेंच वाटलें की हॅमलिनचा सारंगीवाला पुण्यांला आला असून तो इथल्या साऱ्या मुलांना भुलवून बुडविण्यासाठी टिळक तलावाकडे नेत आहे. त्यानंतर आपले संकेत अथवा नियम मोडल्याच्या निमित्ताने बालवीरांच्या पुढाऱ्यांनी आपल्या असहाय अनुयायांना बुडविण्याचा सपाटा चालू केला, तेव्हा हॅमलिनच्या मुलांना एकदम बुडविणारा सारंगीवाला आणि त्यांना नित्य बुडविण्याची संधि साधणारे बालवीरांचे पुढारी यांच्यांतील प्रभेद माझ्या ध्यानांत आला !

कित्येकदा या बालवीरांतील बालकांपेक्षाहि लहान अर्भकांना त्यांचे आईवडील पोहायला आणतात. उदाहरणार्थ, मराठी वाचकांना ' भिल्लिणीचीं बोरें ' चारणारी सुप्रसिद्ध भिल्लीण आपल्या अर्भककन्येच्या पाठीला एक ठोकळा बांधून तिला तळ्यांत टाकून देत असे. अशाच एका प्रसंगीं ' आई, मी बुडतें ग, ' अशा सईच्या हाका ऐकून मीं तिला उचललें आणि पाठीला ठोकळा बांधलेला पाहून तिला परत पाण्यांत टाकलें. त्या क्षणीं सईचें

सद्भाग्य पाहून मला माझ्या हतभाग्याचा संताप आल्यावाचून राहिला नाही. कारण अगदी लहानपणीं एकदां मी चालत आणि रांगत परांजप्यांच्या विहिरीच्या कांठावर जाऊन तिथून पाण्यांत डोकावून ' बाळ ये, ' अशा माझ्या प्रतिबिंबाला हांका मारीत होतों. त्या हांका ऐकून पाय न वाजवितां पाठीमागून येऊन आईने मला अलगद उचलून नेलें. तेव्हापासून त्या परांजप्यांचा शेजार गुढेपर्यंत खोलींत कोंडून स्थानबद्ध करून ठेवण्याचा नवा निर्बंध माझ्यावर लादण्यांत आला. या अत्याचाराची आठवण झाली की अजून माझा संताप अनावर होतो, आणि आमच्या निपाणी कर्नाटकापेक्षा जलमय बंगाल्यांत मीं जन्मलों असतों तर माझ्या अंगाची अशी लाही झाली नसती, असें वाटल्यावाचून रहात नाही. माल तिथेहि ' गगने गरजे मेघ घन बरसा। तीरे एका बसे आछि नाहि भरसा ' असल्या कुटुंबांत जन्म लाभला असता, तर काय करतां ?

असो. वर सांगितल्याप्रमाणे माघ-फाल्गुनांत जेव्हा आम्ही मित्रांमित्रांमध्ये स्पर्धा करीत असतों, तेव्हा त्या कर्मयोग्यांच्या तलावावर ब्रह्मचर्याश्रमाचें साम्राज्य चालू असतें. पुढें चैत्रांत स्त्रिया आणि वैशाखांत मुलें तळ्यावर भरलीं म्हणजे तिथे गृहस्थाश्रमाचें सर्वव्यापक चित्र दिसूं लागतें. पुढे ज्येष्ठांत मृग लागल्यानंतरहि जे थोडे फार ज्येष्ठ स्त्री-पुरुष पोहायला येतात, त्यांच्या पोहण्याला तळ्याचा वानप्रस्थाश्रम .म्हणणेंच उचित होईल. त्यानंतर एकदा आषाढांतहि पोहत राहण्याचा आम्ही हट्ट धरला असतां एके दिवशीं नदीच्या पुराचें भगवें पाणी तळ्यांत शिरून तिथल्या हिरव्या पाण्याचा वर्ण त्याने सपशेल पालटून टाकला. कर्मयोग्यांच्या तलावाला संन्यास-दीक्षा मिळण्याचें हें दुर्मिळ दृश्य त्या दिवशीं ज्या तिघांनी पाहिलें आणि अनुभविलें, त्यांच्यापैकी कै. अनंतराव काळे हे अकालींच दिवंगत झाले असल्याने त्यांचा इथे उल्लेख केल्यावांचून राहवत नाही. संन्यासाश्रमासाठी तळ्याच्या छाट्या रंगविण्याचा हा कार्यक्रम होण्यापूर्वीच बहुतेक वर्षीं तेथील पाणी नदींत सोडून तलावाच्या जलदेवतेला जलसमाधि देण्यांत येते.

आमच्या तलावाला टिळकांच्यासारख्या निष्कामकर्मयोग्याचें नांव लाभलें असल्याने तेथील पाण्यांत नियमितपणें पोहणाऱ्यांना वर्णाने आणि तत्त्वज्ञानानेहि टिळकांचे अनुयायी बनावें लागतें. मात्र इथला कृष्णवर्ण टिळकांच्या कृष्णवर्णासारखाच असला तरी इथला निष्काम-कर्मयोग मात्र गीतारहस्यांतल्या निष्काम-कर्मयोगापेक्षा सकृद्दर्शनींच विभिन्न दिसतो. वाढत्या उन्हाळ्यामुळे पोहणाऱ्यांच्यापेक्षा डुंबणारेच जेव्हा तलावावर अधिक प्रमाणांत येऊं लागतात, तेव्हा निर्मनुष्य क्षेत्राच्या अभावीं मित्रांशीं चालविलेल्या स्पर्धा बंद करून ' आलिया भोगासीं असावें सादर ' या न्यायाने आम्हाला तरुणीसंतरणशिक्षणनाटिकेंत भाग घ्यावा लागतो. या नाटिकेंत, संतरणशिक्षणाची पहिली दीक्षा घ्यावयाला आलेल्या मुलींना, आयत्या वेळीं त्या नको म्हणूं लागल्यानंतर त्यांचें करग्रहण करून त्यांना खोल पाण्यांत ओढून नेलें तरी तें करग्रहण केवळ त्यांच्या संतरणशिक्षणाला हातभार लावण्यापुरतेंच असतें, अशीच साक्ष सारे शारीरिक शिक्षणाचे तज्ज्ञ देतील. जागच्या जागीं तरंगायला शिकवितांना त्यांच्या गोवर्धना-सारख्या अवजड किंवा त्याच्यावरील लतेसारख्या हलक्या तनूला आधार देण्याकरिता हळूच हनूला अंगुलि लावावी लागते. त्यांना सूर मारायला शिकवितांना तर शिक्षकाला त्यांचे चक्क पाय धरावे लागतात. घसरगुंडीवरून घसरण्यासाठी जेव्हा आम्ही त्यांची सर्वांसमक्ष मनधरणी करतों•तेव्हा ती केवळ तलावांतील जीवनांत घसरून पडण्यापुरतीच असते, तलावाबाहेरील जीवनांत नव्हे; हें निष्काम-कर्मयोग्यांना सांगायला नकोच. असो. हा सारा निष्काम कर्मयोग आचरत असतांनासुद्धा उषेने जेव्हा माझ्या डोक्यावरून उडी मारण्याचा संकल्प सोडला,

तेव्हा मलाहि थोडें चमकल्यासारखेंच झालें. कारण स्मरगरलखंडनम् , मम शिरसि मंडनम् , देहि पदपल्लवमुदारम् , असें जयदेव म्हणत असला तरी नवशिक्या उषेची उडी चुकून माझी मान मोडण्याची शक्यताहि मला विचारांत घ्यावी लागली. त्यामुळे मी कांठाच्या जवळच उभा राहिल्याने उषेने डोक्यावरून उडी मारली तरी तिचा थोडा हिरमोड झाल्यावाचून राहिला नाही. पण आपल्या मानमोडीपेक्षा तिचा हिरमोडसुद्धा पुरवला, असा विचार करून मीं तिकडे लक्ष दिलें नाही.

तळ्यावर पोहायला शिकायला काळ्या मुली आल्या तर त्यांना तिथे न येण्याची सूचना करण्यांत कांहीच अर्थ नसतो. कारण तेथील पाण्याने आणि उन्हाने त्यांचा मूळचा काळा रंग अधिकच काळा कुळकुळीत होतो. पण उषेसारख्या 'सर्वशुक्ला सरस्वती' सारख्या किंवा नलिनीसारख्या आमच्या भाव्यांच्या भाषेंत बोलायचें म्हणजे टोटेनक्लास (प्रेताप्रमाणे फिकट) मुली जेव्हा तळ्यावर येतात, तेव्हा त्यांना तिथे येण्याचे परिणाम समजून सांगावेसे वाटतात. कै. प्रभातकुमार मुखर्जींनी आपल्या 'बलवान् जामाता' या कथेंत नलिनीकांत नांवाच्या जावयाची अशी गोष्ट सांगितली आहे की त्याच्या लग्नांत एका मेहुणीने त्याच्यावर कविताच रचली.

नलिनीपरि मुद्रा त्याची । नलिनी ज्याचें नाम
कोमल, कोमल, कोमल अति । जैसें कोमल नाम
जैसें कोमल तैसें विकल । तैसें आलस्यधाम
नलिनीपरि मुद्रा त्याची । नलिनी ज्याचें नाम.

ही टवाळी ऐकून जांवईबुवांनी व्यायाम करून कायापालट केला आणि शिकारीचा नाद लावून घेऊन भिल्लासारखें शरीर करून घेतलें. पण त्यामुळे श्वशुरगृहीं त्यांना कोणीच ओळखीना. ही सारी कथा उषानलिनींना सांगून मीं त्यांना बजावलें की टिळक–तलावांत पोहण्याने तुमच्यांत त्या नलिनींसारखाच बदल होईल. पण महाराष्ट्रांत श्रद्धा नसल्यामुळे माझ्या सांगण्यावर त्या अश्रद्ध मुलींचा विश्वासच बसला नाही.

या एका गोष्टीपुरता त्यांनी माझ्यावर विश्वास ठेवला नसला, तरी एकंदरीने विद्यार्थी-विद्यार्थिनींचा माझ्यावर लौकर विश्वास बसतो. याचें एक कारण म्हणजे कौटिल्याने सांगितलेला 'उपाध्यायसहभूः शिष्यजने दुःशीलता' हा दुर्गुण मीं अजून संपादिला नाही, हें होय. पण हें केवळ अभावात्मक कारण झालें. याच्यापेक्षा अधिक महत्त्वाचें कारण म्हणजे माघाने म्हटल्याप्रमाणे 'नैवाहो विरमति कौतुकं प्रियेभ्यः' अर्थात् प्रेमिकांच्या कौतुकाला अंतच नसतो, हें होय. या नियमाला अनुसरून मी तळ्यांत माझ्या हातांवरील ओझ्यांचें सदा सर्वदा कौतुकच करीत असे. या ओझ्यांपैकी कांही मुली जेव्हा मला 'सर' म्हणूं लागल्या, तेव्हा मात्र मी त्यांचा निक्षून निषेध केला. कारण भाषाशुद्धीच्यासंबंधी असला प्रमाद मीं चालू दिला तर माझा दिवंगत मित्र काय म्हणेल, असें भय मला अजूनहि वाटतें. दुसरी गोष्ट अशी की मी शिक्षक या नात्याने पोहायला शिकवीत नसून केवळ कवि या नात्याने शिकवीत होतों. पण या नवकाव्याच्या युगांत कवि म्हणवून घेण्याचाहि मनाला संकोच वाटतो. त्यामुळे 'मला नुसतें करंदीकर म्हणा' असें त्यांना सुचवावें लागतें.

तळ्यावरील एकंदर वातावरणाचा एक सुपरिणाम हा होतो की 'थोरांपासुनि दूर दूर फिरतों लाजूनि वस्त्राविणें' अशी मनःस्थिति इथे सहसा कोणाची होत नाही. यामुळे एरवीं

वेताळाचा उपासक असलेल्यालासुद्धा इथे सौंदर्योपासक बनणें फारसें अवघड जात नाही. सौंदर्यदेवतेच्या उपासकाला तिचें अनुकरण करणें अशक्य असल्याने त्याला अल्प, किंवा अधिक प्रमाणांत तिचें अनुसरण करण्यावाचून गत्यंतर नसतें. पण या अनुसरणामुळे उपासकाच्या उद्दिष्टाविषयी मानवी देवतेच्या मनांत विपरीत ग्रह निर्माण होतात. तेव्हा अनुसरणाचाहि त्याग करून सौंदर्यदेवतेवर दुरून दृष्टि ठेवून आपलें मन सर्वस्वीं कल्पनेच्या स्वाधीन करावें लागतें. कामनेच्या जगांतून कल्पनेच्या जगांत प्रवेश केला म्हणजे कळून येतें की कामनेच्या परिपूर्तीसाठी परिश्रम करावे लागत असले, तर कल्पनेच्या अभिव्यक्तीसाठी परिश्रम करावे लागतात. कामनेची एकदा पूर्तता झाली की कामनापूर्तीचा स्वर्ग लुप्त होतो. उलट पक्षीं कल्पनेची पूर्णपणें अभिव्यक्ति झाली म्हणजे अक्षय आनंदाचें एक नवें निधान आपल्या हातीं लागतें. कामनापूर्तीनंतर मानवाच्या मनांत आसक्ति तरी उत्पन्न होते, नाही तर विरक्ति तरी उत्पन्न होते. या दोनहि अवस्था कलानिर्मितीला प्रतिकूल आहेत. या आसक्तिविरक्तींच्या द्विविध संकटांतून सौंदर्योपासनेला निभावून नेणें हें दैवाच्या अनुकूलतेवर म्हणजे बहुतांशीं सौंदर्यदेवतेच्या प्रतिकूलतेवर अवलंबून असतें. कामनापूर्ति ही सुदैवावर अवलंबून असली तर कल्पनेची अभिव्यक्ति ही दुर्दैवावर अवलंबून असते. कल्पनेच्या अभिव्यक्तीची प्रक्रिया अशी कांहीशी चमत्कारिक असल्यामुळे कलाकारांना सौंदर्यदेवतेची उपासना करून त्यांची अवकृपा संपादन करावी लागते. ही गोष्ट सुंदरीच्या कृतघ्नतेमुळे आणि माझ्या तुटकपणामुळे सहज साध्य होते.

कला–निर्मितीची ही प्रक्रिया ध्यानांत न आल्यामुळे इकबाल कवींनी भारतीय कवि, चित्रकार, गायक या सर्वांना आपल्या मानगुटीवर स्त्रीला बसवून घेतल्याबद्दल दोष दिला आहे. या दोषाचे पहिले धनी अर्थात् भोलाशंकर हेच असून, त्यांनी आपल्या मस्तकावर गंगेला स्थान दिल्यामुळेच भारतांतील सारे भंगड कलाकार स्त्रीला माथ्यावर घेऊन नाचत असतात. तेव्हा तळ्यांत आम्हाला त्याचें थोडेंफार अनुकरण करावें लागल्यास त्यांत कांहीच नवल नाही. आपल्या हातांवरील ओझीं स्वतंत्रपणें पोहूं लागलीं म्हणजे लौकर आत्मविश्वास येण्यासाठी त्यांना खोल पाण्यांतून फेरी मारावयाला ओढून न्यावें लागतें. अशा फेरींत स्वाभाविकपणेंच ' मृदुतरतनवोऽलसाः प्रकृत्या । चिरमपि ताः किमुत प्रयासभाजः ' असा अनुभव येऊन त्यांनी हातपाय हलविणें स्थगित केलें म्हणजे अनन्यगतिक होऊन त्यांना मानगुटीवर बसवून घेणें भागच पडतें. अशा प्रसंगीं एखादा अपघात झाला तरी तो पाठीवरील भार असह्य होऊन घडण्यापेक्षा एखाद्या लीलेच्या गळामिठीचा आनंद असह्य होऊन घडण्याचा संभवच अधिक.

सलिलांतलि लीलांचें यथार्थ वर्णन करावयाचें म्हटलें तर तें शृंगारिक कल्पनांच्या वाचून करणें शक्यच नसतें. शृंगारांत मीलनाच्या प्रथम सप्ताहांत रमण पुढाकार घेत असतो, त्याप्रमाणेच तरुणीसंतरणशिक्षणनाटिकेच्या पहिल्या अंकांत शिक्षक पुढाकार घेत असला, तरी नंतर विद्यार्थिनीं इतक्या पक्क्या बनतात की त्यांना पाण्याबाहेर काढणें हें अवघड होतें. त्या वेळीं त्यांना दोनचारदा बुडवून नागलोकाचें दर्शन घडविलें म्हणजेच त्या तलावाच्या कांठाशीं येऊन महीगमननृत्य करूं लागतात. एखाद्या वेळीं मात्र नाग लोकाच्या एखाद्या रहिवाशाला या मानवनंदिनींच्या सह संतरण करण्याची इच्छा होऊन त्याने आपलें मस्तक वर काढलें म्हणजे मात्र या सहशिक्षणाच्या अभिमानी सर्पराजांच्या सहसंतरणामुळे संत्रस्त होऊन धडपडत बाहेर पडतात.

---

# संस्कृत काव्यांतील रंगांचा घोटाळा

ले. डॉ. म. वि. आपटे.

काळा, पांढरा, तांबडा, हिरवा इ. प्रकारें रंगांचें वर्णन करतात. मराठींत या शब्दांचे जे अर्थ आहेत ते बरेच निश्चितार्थक आहेत. परंतु मराठीची मायभाषा जी संस्कृत तिजमध्ये रंग दर्शविणारे जे शब्द आहेत ते बरेच घोटाळ्याचे आहेत असें अनेक प्रसंगीं आढळून येतें. राम आणि कृष्ण यांचें वर्णन मेघश्याम किंवा घननील असें करतात. श्याम=नील असें समीकरण यावरून मानावें लागतें. रामरक्षास्तोत्रामध्ये रामास दूर्वादलश्याम म्हटलें आहे. तेथे मात्र पंचाईत उत्पन्न होते. दूर्वादलांचा रंग हिरवाच समजला पाहिजे; तो निळा म्हणतां येत नाही. रामाचा रंग निळा एकवेळ आपण पतकरूं, पण हिरवा कसा पतकरावा ? गौर म्हणजे गोरा किंवा पांढरा असें आपण समजतों; पण सोन्याचा किंवा केशराचा रंगहि गौर असा वर्णिलेला आढळतो. म्हणून गौर म्हणजे पिवळस पांढरा असें म्हणावें लागतें. हे घोटाळे कसे उत्पन्न झाले ? ते सोडविण्यास कांही उपाय आहे कीं नाही ? आहे असें आढळल्यावरून तो येथे निवेदन करीत आहें.

## उदाहरणें

फुटकळ शब्दप्रयोगांवर अवलंबून न राहतां आपण कालिदास-काव्यांतील स्पष्ट उदाहरणेंच घेऊं या.

इन्दीवरश्यामतनुः नृपोऽसौ त्वं रोचनागौरशरीरयष्टिः । अन्योन्यशोभापरिवृद्धये वां योगः तडित्तोयदयोरिवास्तु ॥ र० ६.६५. येथे पुरुषशरीराचें वर्णन श्याम असें केलें असून त्यास इन्दीवर म्हणजे निळें कमळ आणि मेघ यांची उपमा दिली आहे; तसेंच स्त्रीशरीरास गौर म्हटलें असून त्यास रोचना आणि तडित् म्हणजे आकाशांत तड्तड्णारी वीज, यांची उपमा दिलेली आहे. पुरुषशरीराचा रंग कमळाच्यासारखा निळा नसतो. तो काळसर असतो. तेव्हा येथे निळा आणि काळा यांना सामान्यतः श्याम म्हटलेलें आहे हें उघड आहे. त्याचप्रमाणे गोरा अंगवर्ण, आकाशी वीज आणि रोचना यांच्या रंगांत थोडथोडा फरक असतो. तरी त्यांना सामान्यतः गौर असें म्हटलें आहे.

त्वया पुरस्तात् उपयाचितो यः सोऽयं वरः श्याम इति प्रतीतः । राशिर्मणीनामिव गारुडानां सपद्मरागः फलितो विभाति ॥ रघु० १३.५३. वडाचा रंग अंशतः तांबडा आणि बहुशः हिरवा असें येथे दर्शविलें असूनहि त्याचें नांव 'श्याम' असें असल्याचें सांगितलें आहे.

रघुवंश-काव्यांत जें गंगायमुनासंगमाचें वर्णन आहे ( सर्ग १३.५४ ते ५७ ) त्यांत गंगाप्रवाह पांढरा आणि यमुनाप्रवाह काळा असें सांगण्याचा उद्देश स्पष्ट आहे. त्या प्रसंगीं कवीनें योजिलेलीं उपमानें आणि वर्णवाचक शब्द असे :—

अनुक्रमणिका

| गंगा | यमुना |
|---|---|
| मुक्ता | इन्द्रनील |
| सितपंकज | इन्दीवर ( निळें ) |
| राजहंस | कादम्ब ( काळसर ) |
| चंदन | कालागुरु |
| चान्द्रमसी प्रभा | छायाविलीन तमस् |
| शुभ्रा शरदभ्रलेखा | नभःप्रदेश ( निळें ) |
| भस्मांगराग | कृष्णोरग |

गंगेला दिलेल्या सर्व उपमा पांढऱ्या पदार्थांच्या आहेत. यमुनेला दिलेल्या मात्र कांहीं निळ्या आणि कांही काळ्या पदार्थांच्या आहेत.

अभ्र आणि नभस् या दोहोंतील भेद कवीने येथे स्पष्ट केला आहे ही गोष्ट मुद्दाम ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. नभस् म्हणजे निरभ्र आकाश असा येथे अर्थ आहे. त्याचा रंग निळा समजावयाचा.

उत्पश्यामि त्वयि तटगते स्निग्धभिन्नाञ्जनाभे ।
सद्यःकृत्तद्विरददशनच्छेदगौरस्य तस्य ॥
शोभामद्रेः स्तिमितनयनप्रेक्षणीयां भवित्रीम् ।
अंसन्यस्ते सति हलभृतो मेचके वाससीव ॥ मेघदूत ६१

मेघ कैलासावर गेला म्हणजे त्याची शोभा बलरामाने आपल्या खांद्यावर घेतलेल्या निळ्या वस्त्रासारखी दिसेल असें येथे म्हटलें आहे. पण तत्पूर्वी मेघाचा रंग पिसकारलेल्या काजळासारखा आणि कैलासाचा रंग नुकत्याच तोडलेल्या हस्तिदन्तासारखा असें सांगितलें आहे. मेघाचा रंग एकाच वेळीं निळा आणि काळा कसा असणार? आणि हिमाच्छादित कैलास तरी गौर कसा म्हणावा? गौर म्हणजे शुभ्र पांढरा नव्हे तर पिवळस किंवा तांबुस पांढरा असें मानणें प्राप्त आहे, कारण तो ताज्या कापलेल्या हस्तिदन्तासारखा आहे असें म्हटलें आहे. दाताच्या आंत मेद आणि रक्त असतें त्याचा रंग जमेस धरला पाहिजे.

उमापि नीलालकमध्यशोभि विस्रंसयन्ती नवकर्णिकारम् , कु. ३. ६२ येथे केशांना नील असें विशेषण लाविलें आहे. केस कधी निळे असतात ? ते पिंगे किंवा पांढरेहि असूं शकतात पण निळे नसतात. तेव्हां नील=कृष्ण असें मानलें पाहिजे.

जातरूपरस—गौरमण्डलः ।...... बर्हिणः ॥ कुमार. ८. ३६ येथे मोराचा पिसारा सोन्याच्या रसासारखा गौर असें म्हटलें आहे.

पत्रश्यामा दिनकरहयस्पर्धिनो यत्र वाहाः ॥ मेघदूत २. १३. हें अलका नगरीचें वर्णन आहे. यांत अलकेंतील घोडे सूर्याच्या घोड्यांची स्पर्धा करणारे आणि झाडांच्या पालवी-प्रमाणे श्याम असतात असें सांगितलें आहे. सूर्याच्या घोड्यांना हरित म्हणतात आणि पालवीचा रंग हिरवाचं असतो. तेव्हा श्याम म्हणजे हिरवा असा अर्थ घेतला पाहिजे. सामान्य घोडे श्याम म्हणजे काळसर असतात पण हे अलकेंतील अद्भुत घोडे पालवीप्रमाणे हिरवे असतात असें निक्षून सांगितलें आहे.

तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिंबाधरोष्ठी । मेघदूत २. २२ यक्ष आपल्या पत्नीचें वर्णन करतांना तिला श्यामा असें विशेषण देत आहे. हें विशेषण वर्णवाचक नसूनं केवळ सौंदर्यवाचक आहे असें टीकाकार म्हणतात, पण तें त्यांचें म्हणणें पटण्याजोगें नाही. कारण या पद्यांत कवीला यक्षपत्नी सामान्यतः सुंदर आहे असें सांगून दुसरा विषय वर्णनास घ्यावयाचा आहे असें नाही, तर विस्तरशः सौंदर्यच वर्णावयाचें आहे. आकार, आकृति, रंग या तीनहि सौंदर्यांगभूत गोष्टी सांगावयाच्या आहेत. तन्वी शब्दाने आकार दर्शविला, श्यामा शब्दाने सामान्यतः सर्वांगाची कान्ति दर्शविली आणि पुढील इतर शब्दांनी अवयवांची विशेष आकृति किंवा रंग यांचा उल्लेख केला. असें हें सौंदर्यविश्लेषण आहे. तथापि घटकाभर श्यामा म्हणजे सुंदर असाच अर्थ घेतला, तरी श्यामा शब्दाचा अर्थ वर्णवाचक असतांना हा दुसरा अर्थ त्याला कसा प्राप्त झाला ही जिज्ञासा राहतेच. येथे श्यामा याचा अर्थ काळसर असा घेतांच येत नाही. कारण याच स्त्रीसंबंधी कवीने असेंहि म्हटलें आहे की :—

यास्यत्यूरुः सरसकदलीस्तंभगौरश्चलत्वम् । मे. उ० ३६

तन्वंशुकैः कुङ्कुमरागगौरैः अलंक्रियन्ते स्तनमण्डलानि । ऋतु. ६. ४. येथे केशराचा रंग गौर असें म्हटलें आहे. अपाङ्गयोः केवलमस्य दीर्घयोः शनैः शनैः श्यामिकया कृतं पदम् ॥ कुमार ५. २१ येथे श्याम म्हणजे काळसर याविषयी शंका नाही.

एकंदरींत या उदाहरणांवरून असें दिसून येतें कीं, नील या शब्दाचा अर्थ निळा आणि काळा असे दोन आहेत, श्याम या शब्दाचा अर्थ काळसर, निळसर, हिरवा आणि बहुधा गौर म्हणजे गोरा—तांबडा+पिवळा+पांढरा—असाहि आहे.

## उपपत्ति

नील आणि कृष्ण यांचा घोटाळा कसा झाला असावा याविषयी उपपत्ति लावणें विशेष कठीण नाही. मंद निळा, आणि मंद काळा हे पुष्कळसे एकासारखे एक दिसतात. एका शेजारीं एक ठेवले तर ते ओळखतां येतात; पण एका मागून एक आणि एकदम पाहिलें तर ओळखतां येत नाहीत.

तांबडा, पिवळा आणि हिरवा हे रंग देखील पुष्कळ फिके (मंद) केले तर ते एकमेकांपासून वेगळे असे ओळखूं येत नाहीत; इतकेंच नव्हे तर ते निळ्यापासूनहि वेगळे असे समजून येत नाहीत. रंग फिका करणें म्हणजे त्यापासून नेत्रांस मिळणारा प्रकाश कमी करणें होय. ही गोष्ट साधण्याकरिता दृश्यापासून नेत्रांचें अंतर वाढविलें म्हणजे झालें. तांबडा किंवा हिरवा कंदील समोर ठेवून आपण त्यापासून दूर दूर जावें म्हणजे कंदिलाचा रंगीत प्रकाश प्रथम अधिकाधिक फिका होऊं लागतो. मग त्याचा तांबडेपणा किंवा हिरवेपणा नाहीसा होतो, पण प्रकाश दिसतच राहतो. आणखी दूर गेल्याने मात्र तो मुळींच दिसेनासा होतो. प्रकाश दिसतो आहे, पण त्याचा रंग कळत नाही, अशा अवस्थेंत त्याला श्याम म्हणतात. एकदा जो श्याम ठरला तो सर्वच अवस्थांत श्याम म्हणणें साहजिकच आहे. असें झाल्यामुळे तांबडा, पिवळा, हिरवा, निळा हे सर्व वर्ण श्याम झाले. दिवसा-उजेडीं जे पदार्थ तांबडे हिरवे इ० रंगांचे असतात, तेच दिवस मावळतांना केवळ श्याम होऊन जातात. रात्रीं अदृश्य होतात आणि उषःकालीं प्रथम श्यामच होऊन मग तांबडे, हिरवे इ० होतात.

## समाजपरिणति

आज प्रत्येक समाजांत असे कांही लोक आढळतात की त्यांना काळा व पांढरा असे दोनच रंग समजतात. तांबडा, हिरवा, निळा इ. रंग कळतच नाहीत. त्यांच्या दृष्टीने रंगाचे दोनच प्रकार, श्वेत आणि श्याम म्हणजे श्वेतेतर. तांबडा, हिरवा, निळा इ० रंगांना ते श्यामच समजतात. अशा लोकांना अवर्णज्ञ म्हणतात वेगवेगळ्या समाजांत अशा अवर्णज्ञांचें प्रमाण वेगवेगळें असतें. आज जे अगदी मागासलेले समाज आहेत, त्यांच्यांत अशा अवर्णज्ञांचें प्रमाण पुढारलेल्या समाजापेक्षा पुष्कळ अधिक असतें. यावरून शास्त्रज्ञांचा तर्क असा आहे की वर्णज्ञान हें सुधारणेचें लक्षण आहे.आदिमानवसमाज पूर्णपणें अवर्णज्ञच होता. पुढे त्यांत वर्णज्ञ लोक निपजूं लागले, आणि त्यांचें प्रमाण वाढत गेलें.

भाषणसामर्थ्य हें मानवाचें विशेष सामर्थ्य आहे. वर्णज्ञानाच्या मागोमाग वर्णवाचक शब्द भाषेंत आले हें उघड आहे. आता ज्या अर्थी वर्णज्ञान होण्यापूर्वी मानवाला श्वेत आणि श्याम हे दोनच रंग समजत होते, त्या अर्थी श्याम आणि श्वेत हेच ( किंवा या अर्थाचेच ) शब्द सर्वात जुने असले पाहिजेत, असें म्हणावें लागतें. जेव्हा नव्याने वर्णज्ञान होऊं लागलें, तेव्हा त्यांना दोजावयाचे शब्द नवीन तयार करावे लागले. ते शब्द रक्त, पीत, हरित, नील इ० होत. वर्ण कळत आहेत, पण त्यांना भाषेत नांवें नाहीत असा जो काळ गेला त्या काळांत सर्व श्वेतेतर वर्णांना श्याम हीच संज्ञा होती, असें म्हणणें भाग आहे. श्याम, श्यामल, श्वेत, सित, शुभ्र, हा शब्दांचा संच प्रथम प्रचारांत आल . नंतर ताम्र, पीत, हरित इ० संच प्रचारांत आला. हा सर्व संच पूर्वी श्याम या एकाच संज्ञेत समाविष्ट होता. वर्णज्ञान उद्भवलें, फैलावलें आणि तें व्यक्त करण्यास पाहिजेत तितकीं नवीं नांवें प्रचारांत आलीं, तरी जुनीं नांवें राहिलींच; इतकेंच नव्हे तर त्यांचे जुने अर्थ, की जे अधिक संदिग्ध होते, ते तसेच राहिले. यामुळे घोटाळे उत्पन्न झाले, ते आपणांला आज महाकवींच्या कृतींतहि दिसत आहेत; असें तात्पर्य म्हणून लक्ष्यांत ठेवणें अगत्याचें आहे.

## वर्णान्तर

कोणताहि वर्ण फिका होत गेला म्हणजे तो श्याम दिसूं लागतो असें आताच म्हटलें. पण श्याम शब्दाचा संदिग्धपणा वाढूं नये म्हणून या विशिष्ट श्यामाला दुसरें नांव देणें अवश्य आहे. तें जुन्या नामावलींतूनच काढावयाचें तर धूसर असें निघतें.

निवेशयामास विलंघिताध्वा क्लान्तं रजोधूसरकेतु सैन्यम् । रघु० ५.४२. आता अशी एक मौज दृष्टीस पडते की तांबडा रंग फिका होतां होतां धूसर होण्यापूर्वी पिवळा होतो. इंद्रधनुष्यांत जी वर्णावलि दिसते तिच्यांत सात रंग असतात, पण त्यांतले तांबडा, पिवळा, हिरवा, निळा असे चारच चांगले स्पष्ट असतात. त्यांतल्या त्यांत पिवळा विशेष ठळक (उजळ) असतो, म्हणून मंद पांढरा आणि मंद पिवळा यांचा घोटाळा होतो आणि मंद तांबडा हा पिवळा दिसतो; म्हणून पांढरा, पिवळा आणि तांबडा यांचे घोटाळे उत्पन्न होतात. गौर शब्दाच्या अर्थाचे घोटाळे यामुळे उत्पन्न झालेले आहेत.

२

सूर्य–प्रकाशाच्या वर्णावलीमध्ये तांबडा आणि पिवळा यांच्यामध्ये नारिंगी असा एक प्रदेश ओळखतां येतो. या वर्णाला स्पष्टार्थक संस्कृत शब्द नाही. बहुधा अरुण याचा अर्थ नारिंगी असा असतो. परंतु अरुण आणि रक्त याचे घोटाळे नेहमी होतात. वस्तुतः अरुण हा ताम्राप्रमाणेच मंदावस्थेंत पिवळा दिसणारा आहे, हें या घोटाळ्याचें कारण आहे. डोळ्याच्या रंगास अरुण आणि रक्त हीं दोनहि विशेषणें लावलेलीं आढळतातः—

पद्मकान्तिमरुणत्रिभागयोः संक्रमय्य तव नेत्रयोरिव ॥ कुमार० ८. ३०.
आर्द्रकेसरसुगन्धि ते मुखं मत्तरक्तनयनं स्वभावतः ॥ कुमार० ८.७६

वर्णावलींत एका अंगाला ताम्र, अरुण, पीत तर दुसऱ्या अंगाला पारवा, निळा, जांभळा असे तीन वर्ण असतात. या दुसऱ्या त्रिकूटांतला भेद पहिल्यातल्या इतका स्पष्ट नाही. आणखी असें की हे सर्व वर्ण मंद केले असतां एक सारखे एक निळेच दिसतात आणि अधिक मंद केले असतां धूसर दिसतात. पारवा आणि जांभळा यांना संस्कृतांत चांगले रूढ शब्द नाहीत. सगळेच नील या संज्ञेंत सामावतात.

## वर्णसंकरण

वर्णावलींतील सात वर्ण हेच शुद्ध वर्ण होत. यांतल्याच दोन दोन किंवा तीन तीन वर्णांच्या ( प्रकाशांच्या ) मिश्रणाने बहुत रंग मिळूं शकतात. सूर्यप्रकाश–शुभ्र सूर्यप्रकाश–हा या सातांच्या मिश्रणाने झालेला प्रकाश आहे. त्याचेंच ज्ञान आपणांला प्रथम झालें. इतरांचें नंतर झालें, म्हणून रंग या संज्ञेंत पांढरा हा प्रकार न गणण्याचीहि प्रथा आहे. पांढरा पदार्थ म्हणजे बिनरंगी. रंगीत पदार्थ म्हणजे पांढरा काळा, याखेरीज कोणत्या तरी रंगाचा असाहि वाक्प्रचार आहे. असा प्रचार होण्याचें कारण हेंच कीं पांढरा–काळा हे तेवढे रंग प्रथम ओळखत असत, नंतर इतर ओळखतां येऊं लागले. इतर रंग ते विशिष्ट रंग, आणि पांढरा काळा हे सामान्य रंग होत.

शुभ्र प्रकाश हा अत्यंत परिचयाचा मिश्र प्रकाश खरा, पण याहून वेगळे अनेक मिश्र प्रकाश होऊं शकतात. त्यांतले पिंग, पिंगल, कपिश, बभ्रु हे विशेष प्रसिद्ध आहेत. यांतला पिंगल आणि बभ्रु हे उपेक्षित केशांच्या वर्णनांत येतात. पिंगलाचें उपलक्षण सिंहाचें आयाळ हें घेतां येईल. बभ्रु यांत काय निराळें आहे तें समजत नाही. कालिदासाने पिंग व पिंगल हे शब्द पीत + ताम्र या मिश्रणास लावलेले आहेत. वर्णावलींतील मधला हिरवा वगळून इतर वर्ण मुख्यतः दोन टोकाचे ताम्र व नील मिसळून होणारे हे रंग आहेत. प्रत्यक्ष मिश्रण न करतां नुसते सर्व वर्ण शेजारीं शेजारीं मांडले असतां होणाऱ्या एकंदर देखाव्याला पिंग म्हटलेलें आढळतें.

उपेक्षते यः श्लथलम्बिनीः जटाः कपोलदेशे कलमाग्रपिङ्गलाः ॥ कुमार. ५. ४७.
धूमधूम्रो वसागन्धी ज्वालाबभ्रु शिरोरुहः ॥ रघु. १५. १६.
बबन्ध बालारुणबभ्रु वल्कलम्...॥ कुमार. ५. ८.
अथ नभस्य इव त्रिदशायुधं कनकपिंगतडित्गुणसंयुतम् ॥ रघु. ९. ५४.
नीपं दृष्ट्वा हरितकपिशं केसरैः अर्धरूढैः ॥ मेघदूत, २१

रंग दर्शविणारे आणखी तीनच शब्द आहेत ते असे :—

**धवल = शुभ्र. पाण्डु, पाण्डुर = किंचित् पांढरा, पांढुरका.**

तत्र हंसधवलोत्तरच्छदं जान्हवीपुलिनचारुदर्शनम् । कुमार ८. ८२.

उपययौ तनुतां मधुखण्डिता हिमकरोदयपाण्डुमुखच्छविः ॥ र. ९. ३८.

अथाधिकस्निग्धविलोचनेन मुखेन सीता शरपाण्डुरेण ॥ रघु. १४. २६.

## उपसंहार

रंग ही प्रकाशाच्या योगाने नेत्रद्वारा उत्पन्न होणारी संवेदना आहे. ही संवेदना समाजाच्या प्रथमावस्थेत दोन प्रकारची होती, ती तदनंतर बहुतप्रकारची झाली. असें झाल्यामुळे पूर्वीच्या एका शब्दालाच अनेक अर्थ येऊं लागले. श्वेत आणि श्याम किंवा सित आणि असित अशी एकादी जोडी प्रथम प्रचारांत आली; मग असित किंवा श्याम यांत प्रकार समजून आले. ते ताम्र, पीत, हरित, नील, हे होत. यामुळे श्याम शब्द या सर्वांचा समावेशक झाला. सर्वांत अधिक गोंधळ श्याम शब्दाच्या अर्थासंबंधी आहे. असें असण्याचें कारण नेत्रसंवेदनांची एकांतून अनेकांत परिणति हें आहे.

नेत्रास चेतना देणारा जो प्रकाश त्याचा प्रधान उगम सूर्यापासून आहे. हा सूर्यप्रकाश उषःकालापासून सायंकाळपर्यंत उज्ज्वलतेने कमी, अधिक, पुनः कमी, असा होत असतो. या उजळपणाच्या भेदास अनुसरून त्या प्रकाशानेच दिसणाऱ्या पदार्थांच्या रंगांत बदल होत जातो. रंगासंबंधी कांही घोटाळे यामुळे उत्पन्न होतात. पारवा, निळा, जांभळा तसेच रक्त आणि अरुण यांचे घोटाळे यामुळे उद्भवतात. सप्त रंगांच्या विविध मिश्रणाने विविध रंग निर्माण होत असून या सर्वांच्या वाबतीत थोडथोडे व्यक्तिनिष्ठ भेदहि असतातच. त्यामुळे मिश्रणाच्या वर्णांत तर पुष्कळसे घोटाळे उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. पिंग, पिंगल, बभ्रु, कपिश, यांचे घोटाळे यामुळे उत्पन्न झालेले आहेत.

सप्त त्वा हरितो रथे वहन्ति देव सूर्य । ऋ. १. ५०. ८.

सूर्याच्या रथाला सात घोडे आहेत असें जें ऋग्वेदांत म्हटलें आहे त्याचा अर्थ सूर्यप्रकाशांत सात रंगांचे किरण आहेत, असाच करणें श्रेयस्कर आहे. ग्रह, मास, ऋतु, किंवा संवत्सर यांच्याशीं त्या विधानाचा संबंध जितका आहे, त्यापेक्षा सप्तरंगांशीं अधिक आहे. सूर्याच्या घोड्याला हरित असें म्हणतात तें या वर्णकल्पनेशीं विशेष सुसंगत आहे. हरित हा सप्तवर्णांतला मध्यम वर्ण आहे. म्हणून हरित हेंच नांव सामान्यतः सूर्याचा घोडा या अर्थी रूढ होणें साहजिक आहे. बोलून चालून रूपक आहे; मग तें सर्वांत अधिक सयुक्तिक असेल त्याच रीतीने का सोडवूं नये ?

# छांदस रचनेंतील अक्षरांचें उच्चारण

लें० ना. ग. जोशी

कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांनी "छंदोरचनें"त ओवी-अभंगादि 'छांदस' रचनेचें नियमन, प्रत्येक अक्षराच्या दोन मात्रा मानाव्या लागतात असें सांगून केलें. पण ह्या त्यांच्या मताविषयी श्री. गो. वि. खासगीवाले, श्री. वि. ज. सहस्रबुद्धे वगैरेंनी शंका व्यक्त केली आहे. म्हणून छांदस रचनेंतील अक्षरांच्या उच्चारणाबाबत काय आढळतें तें कांहीं प्रमाणें देऊन दाखवावयाचें आहे.

(१) कै. गणपतराव बर्वे या प्रसिद्ध संगीतशास्त्रज्ञांनी गुजराती भाषेंत "गायन-वादन-पाठमाळा" नांवाचा ग्रंथ लिहिला सून त्यांत (पृ. ४९-५१) अभंगांचें नियमन तबल्याच्या तालाच्या दृष्टीनें पुढीलप्रमाणे केलेलें आहे.

"मोठ्या अभंगांत...४–४ (ताल–) मात्रांचे विभाग पडतात हें खरें...लहान अभंगांत...३ ऱ्या अक्षरापासून ताल सुरू करून चार-चार अक्षरांवर ताल द्यावा. यांतहि वस्तुतः ४ मात्रांचेच विभाग पडतात."

मोठा अभंग : सत्य चिदा नं ऽ द ऽ | ब्र ह्म प द वं ऽ दुं ऽ
÷ ० ÷ ० | ÷ ० ÷ ०

लहान अभंग : साचुं | प ले प ले यो लो, खो टुं | क दी न हीं यो लो
÷ ० ÷ ० | ÷ ० ÷

या गोष्टीचा प्रत्यय कोणालाहि टाळी वाजवून म्हणणी केल्यास येईल. अक्षरांच्या स्वाभाविक कालांतील म्हणणीप्रमाणे उच्चारण केल्यास तालदृष्टीनें (धुमाळी तालाची) 'दुप्पट जलद' लय ठरते आणि प्रत्येक छांदस अक्षरावर एक तालमात्रा येते. हीच स्वाभाविक म्हणणी द्रुत केल्यास तालाची लय स्वाभाविक होते आणि दोन अक्षरांचा उच्चार एका तालमात्रेच्या काळांत होतो. या दोन्ही वेळीं प्रत्येक अक्षराचा सुटासुटा उच्चारणकाळ समानच असतो. म्हणजेच हीं सर्व अक्षरें सारख्या कालभाराचीं होतात. यावरून नियम असा ठरतो कीं,

(अ) छांदस रचनेंत सर्व अक्षरें समकालिक असतात, म्हणजेच दोन मात्रांच्या कालाचीं असतात.

(ब) आणि १ तालमात्रा म्हणजे एक दीर्घ उच्चारकाल किंवा दोन अक्षरमात्रांचा काल होय.

अहमदाबादचे प्रो. रा. ब. आठवले आणि त्यांचे संगीतशास्त्रज्ञ चिरंजीव श्री. वि. रा. आठवले यांनी याच मताला दुजोरा दिलेला आहे. श्री. खाजगीवाले यांना हें तालमान तसें उच्चारण मानल्यास बरोबर वाटतें, पण असें उच्चारणच अस्वाभाविक वाटतें.

(२) घड्याळाची १ टिक्टिक् (किंवा स्टॉप-वाचची टिक्टिक्) हें परिमाण मानून म्हणणी केल्यास अभंगाच्या अक्षरांचा उच्चारणकाल सारखा असल्याचें आढळतें. याचाच अर्थ प्रत्येक अक्षर २ अक्षरमात्रांच्या कालभाराचें असतें.

(३) छांदस रचनेंत सर्वत्र अक्षरोच्चार सारखा असतांहि क्वचित् मध्येंच एका दीर्घोच्चाराच्या कालांत २ लघु अक्षरें येतात. यावरूनहि त्या स्थळीं दोन अक्षरमात्रांची कूस असते हें उघड उघड दिसून येतें :

(अ) दे हो | जा वो अथ वा रा हो

(ब) यु गें अ ठ्ठा वी स विटे व री उ भा
वा मां गीं र खु मा ई दि से दि व्य शो भा

(४) कांही दीर्घाक्षरयुक्त वृत्त, जातिरचना आणि अभंग यांची तुलना केली असतांना हीच गोष्ट सहज नजरेंत भरते :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| विद्युन्माला वृत्त : | विद् युन् मा ला | ऐ सें बो ला | जे थे मा मा | गा गा आ ला |
| हरिभगिनी-फटका जाति | रा मा च्या की | ना मा चा मी | टा हो फो डीं | जो रा ने ऽऽ |
| लवंगलता-साकी जाति | सौ म्यां दृष् टिं | दे हि स्ने हा | दे हे मुक् त्वा | मा न मूऽऽऽ |
| पतितपावन–चंद्रकांत जाति | वि श्वा च्या ही | क क्षे ला जो | ल क्षी प्र शे | नेऽऽऽऽऽऽ |
| देवद्वार अभंग : | जे थे जा तो | ते ऽ ऽ थे ऽ ऽ | तूं मा झा सां | गा ऽ ऽ ती ऽ ऽ |

येथे सर्वच अक्षरें दीर्घ आहेत. म्हणजेच वृत्त विद्युन्माला आणि जाति हरिभगिनी, लवंगलता, पतितपावन यांच्यामधील अक्षरांच्या उच्चाराला दोन अक्षरमात्रांचा काल लागतो. तेवढाच काल अभंगांतील अक्षरांच्या उच्चारालाहि लागतो. याचाच अर्थ या अभंगांतील प्रत्येक अक्षर दीर्घ आहे. येथे या सर्व पद्यप्रकारांची म्हणणी सारखी होते व अभंगांत कोणताहि फरक उच्चारणदृष्ट्या आढळत नाही.

आतां याच अभंगचरणाची तुलना केली असतां इतर सर्व अभंगरचनेंतील अक्षरें अशींच दोन अक्षरमात्रांच्या कालाचीं असतात हें सहज कळून येतें, मग तीं व्याकरणदृष्ट्या गुरु असोत वा नसोत :

(अ) जे थे जा तो | ते ऽ ऽ थे ऽ ऽ | तूं मा झा सां | गा ऽ ऽ ती ऽ ऽ ।

(ब) जी वें ना वां | चो ऽ ऽ नी ऽऽ | तें लें मे ळे | मा ऽ ऽ ला ऽ ऽ ।

(क) अं त्य जा दि | यो ऽऽ नी ऽऽ | तर त्या हरि भे | जे ऽऽ ने ऽऽ ।

वरील तुलनेंत (क) ह्या चरणांत 'तर' आणि 'हरि' हीं दोन लघु अक्षरें दीर्घ (उच्चाराच्या) अक्षरांच्या जागीं आलीं आहेत यावरूनहि त्यांचा काळ दोन अक्षरमात्रांचा असतो हेंच सिद्ध होतें. पण त्याच चरणांत 'त्य', 'दि' आणि 'भ', 'ज' हीं अक्षरेंहि अशींच दीर्घ (उच्चाराच्या) अक्षरांच्या जागीं आल्यामुळे त्यांच्या मात्राहि दोनच मानाव्या लागतात.

या सर्व प्रमाणांवरून माझी तरी खात्री झालेली आहे की छांदस रचनेंतील अक्षरें २ अक्षरमात्रांच्या कालभाराचीं असतात हें कै. माधवराव पटवर्धन यांचें मत अत्यंत सयुक्तिक आहे.

---

# चर्पट-पंजरी

लेखक :-चिं. पां बर्वे, अष्टमी.

पत्रिकेच्या तेविसाव्या वर्षाचा तिसरा अंक म्हणजे आक्टोबर ते डिसेंबर १९५० चा ९६ वा अंक. यांतील रा. फफे यांचा चर्पट-पंजरीवरील लेख वाचून थोडें आश्चर्य वाटलें. त्यावर कोणी ख्यातनाम विद्वान् गृहस्थ योग्य तें लिहितीलसें वाटलें होतें, पण पुढील अंकांत तसें कांही कोणीं लिहिलें नाही. असो.

त्या लेखांतील घटमठाची खटपट, विचार करण्याच्या निरनिराळ्या दिशा दाखविण्यास योग्य आहे हें खरें. पण मुख्याची गोष्ट पाहतां, जो अर्थ योग्य असल्याचें झटकन मनांत यावें, तोच अर्थ 'संभवत नाही' व 'गैर-लागू' असा ठरवून एका फटकाऱ्यांत बाजूला सारला आहे हें तें आश्चर्य होय. चर्पट याचा शब्दार्थ जो 'बुडबुड्यांचा समूह' तो येथे एकदम गैरलागू कसा? क्षणभंगुर व ऐहिक सुखाच्या मोहांत निमग्न झालेल्या जीवास शुद्धीवर आणण्यासाठी अनेक प्रकारचा उल्लेख या स्तोत्रांत आहे हें रा. फफे यांस मान्यच आहे. म्हणजे आशा, वासना, कामना, स्त्रीसुख इत्यादि विषय क्षणभंगुर आहेत, सबब जलबुद्बुदवत् आहेत असाच जर सर्व स्तोत्रांतील विवरणाचा भाग आहे, तर तोच अर्थ संभवत नाही असें कसें ठरावें? स्तोत्रांतील उतारे किती द्यावे? —तूं कोण? कोठून आलास या सर्वांचा नीट विचार कर म्हणजे सर्व असार आहे असें दिसेल. तेव्हा याचा मोह सोडून तत्त्वविचार कर. भार्या कोठपर्यंत विचारील याचा विचार कर. स्त्रीचा मोह फुकट आहे ज्ञान मिळाल्याखेरीज जीवाला परम-प्राप्ति नाही, इत्यादि. म्हणजे सर्व ऐहिक ऐश्वर्याला व उपभोगांना पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे लेखण्याचेंच विवरण स्पष्ट असतांना चर्पट याचा कोशांत आढळणारा 'बुडबुड्यांचा समूह' हा अर्थ असंभवनीय कां असावा?

तसेंच पंजरिका हें एका विशिष्ट छंदाचें नांव आहे हेंहि रा. फफे यांस कबूल असावें; कारण 'हें सहज ध्यानीं येतें' असें त्यांनी या बाबतींत म्हटलें आहे. असें असल्यावर 'चर्पट-पंजरिका' हें त्या स्तोत्रास दिलेलें नांव सार्थ व योग्यच दिसतें. मग तें खुद्द शंकराचार्यांनी दिलें असो, अगर नंतर कोणीं दिलें असो. वृत्ताचें नांव स्तोत्राचे नांवास जोडलेलें असें श्रीशंकराचार्यांचें 'शिवभुजंगप्रयातस्तोत्र' असें एक स्तोत्र आहेच. तेव्हा चर्पट-पंजरिका हेंहि नांव श्रीमत् शंकराचार्यांनीच दिलें असेल असें म्हणावयास फारशी हरकत नाही.

आतां पुढे छंदांतील कांही दोष दाखविले आहेत त्यांचा विचार करूं. 'प्राप्ते सन्निहिते मरणे' हा ध्रुवपदांतील तुकडा दोन मात्रांनी कमी आहे. पण तें त्या काळीं क्षम्य असावें अगर तसेंच पंजरिका हें वृत्त असावें. मराठींत आर्या आणि साकी यांत जसा शेवटच्या चरणांत थोडाच तीन मात्रांचा फेर आहे तसा हा पादाकुलक व पंजरिका यांत असावा. कारण कृष्णानंद सरस्वतींचें जें एक 'तत्त्वमसिस्तोत्र' याच छंदांत आहे, त्यांत पण सर्व श्लोकांच्या चवथ्या चरणांत अशाच दोन् मात्रा कमी आहेत. हा चवथा चरण पुष्कळ श्लोकांत एकच असल्याने ध्रुवपदाप्रमाणेच होय. (मात्र द्वादशपंजरिका या स्तोत्रांत तशा कमी मात्रा नाहीत हें खरें.) 'परे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः' यांत एक मात्रा कमी पडते खरी, परंतु तरीहि हा चरण म्हणतांना कांही कोठे खटकल्यासारखें होत नाही. शिवाय कोऽपि यांत अवग्रह अ ही एक मात्रा आहेच. अशाप्रकारें यांत कोठे कांही वैगुण्याला जागा दिसत नाही.

———

अनुक्रमणिका

# ज्ञानदेवी–परिभाषा

पं. पाण्डुरङ्गशर्मा, आळंदी.

महाराष्ट्रांत पैठणची प्रतिष्ठा भारतीय विद्यापीठ म्हणून वाराणशी विद्यापीठाच्या तोडीची होती. गीर्वाणवाणींतील विद्यांच्या अध्ययनाचीं मुक्तद्वार विश्वविद्यालयें या क्षेत्रांत नामवंत म्हणून पुष्कळच गाजलीं. तसेंच संस्कृत भाषेचें वैभव वाढविणाऱ्या अनेक ग्रंथांचा या विद्यापीठांतून अवतार व उद्धारहि झालेला विद्याव्यासंगी विद्वानांस विदित आहे. विद्यावितरणांत निष्णात विद्यावान् पण्डितांचीं अनेक घराणीं मोठ्या भरभराटीने या प्रतिष्ठानपुरींत प्रगतिशिखराच्या अग्रावर विराजमान झालीं, असें त्यांचा इतिहास सांगतो. पंढरपूरची पांडुरंगमूर्ति विजयनगरहून रामराजाच्या कचाट्यांतून काढून परत पुनः भक्तिपीठांत प्रतिष्ठिल्याचें प्रथित यश पदरांत पाडून घेणारे श्रीसंत भानुदास हे भक्तिभाग्याची जोड या पंडितांच्या माहेरघरास लाभून देण्यांत अग्रेसर गणले जातात. संस्कृताच्या माहेरघरीं मराठीचा मनसोक्त काव्यविलास बहरास आणण्याचें श्रेय त्यांच्या घराण्यास देण्यांत येतें, तें वाजवी आहे. त्यांच्या वंशांत संस्कृत व देशी अशा दोहींस समान प्रेमाने पाळल्याचें प्रसिद्धच आहे. भानुदासाचे पणतु एकोबा पंडित संस्कृत प्राकृतांत सव्यसाची होते, यांत वाद नाही. त्यांनी सरस्वतीला काव्यकुसुमांची लाखोली वाहून आपला आदर अजरामर केलेला आहे. आमच्या मायभाषेंतील आद्यग्रंथ ज्ञानदेवी; तो त्यांनी मुकुटमणि म्हणून मोजला, आराध्य दैवत म्हणून सजवून पूजला व त्याच्या निदिध्यासनांत मनास रंगविलें. त्यांच्या पुत्राचा—हरिपंडितांचा—संक्षेपशारीरकापर्यंत दांडगा व्यासंग झालेला. तो नाथांच्या देखरेखींत सुपुष्ट होऊन थेट वाराणसीपर्यंत पोचला. त्याची प्रतिष्ठा प्रतिष्ठानाहून वाराणशीपर्यंत दरवळत राहिली. हरिपंडिताच्या हस्ताक्षरांतील उपर्युक्त ग्रंथ आम्ही काशीस असतांना महामहोपाध्याय लक्ष्मणशास्त्री द्रविडांच्या संग्रहांत पाहिले आहेत. त्यांच्या कुलांत सर्वांसच काव्यकोश व्याकरणाचें बाळकडू पाजलें जात असे; व त्या वळणावरच त्यांतील विद्वान् पुरुष आपलें ग्रंथपरिशीलनाचें काम चालवीत. नाथ स्वतः तर त्याविषयी फार निष्णात होते; व अभ्यासलेल्या विषयाची सर्वांगाची जोपासना त्यांनी फार दक्षतेने केल्याचीं प्रमाणपत्रेंहि प्रत्यक्ष आढळतात.

एकोबांना ज्ञानेशांविषयी अतिआदर होता; व त्यांच्या विचारांशीं समरस होण्याकरिता नाथांनी त्यांच्या ग्रंथाचें अतिशयच साक्षेपाने उपासन केलें होतें. त्या प्रेमाच्या भराने ते भारले गेले. त्यांनी त्या माऊलीच्या गांवीं खेप्या घातल्या. जागृतीं स्वप्नीं सर्व काल त्यांच्या विचारांत घालविला. वाढलेल्या लळ्याने प्रेमातिशयाच्या भरांत त्यांच्या समाधिस्थानांत शिरून साक्षात् दर्शनाचा योग घडवून आणण्याचें धाडसहि त्यांनी केलें व त्यांच्या या वाङ्मयी मूर्तीला झाडून झटकून साफसुफीने पूर्व सौंदर्यास आणून ती स्वभाषीयांस ब्राह्मविधीने संसारार्थ दान दिली. धन्य त्या महात्म्याची ! त्याने महाराष्ट्रीय भक्तिपंथाला कायमचें ऋणी केलेलें आहे. एकोबांनी प्रकाशिलेली ज्ञानदेवी अध्ययन–अध्यापनांत सतत राहावी, पुनः संस्करणाचा प्रसंग

येण्याइतकें मालिन्य उद्भवूं नये, म्हणून त्यांनी त्या शास्त्रांत शिक्षित असलेला आपला अनुचर आळंदीस स्थायिक करुन ठेविला व त्यास, हें परंपरेने काम चालू रहावें म्हणून, सर्व सोय करुन दिली. त्याच्या प्रवचनाच्या सौकर्याकरिता त्यास विषय विवेचनाची व व्युत्पत्तीची टांचणें सांगून ठेविलीं. त्यांपैकी शंभर शब्दांचें एक टांचण आम्हीं आज आपल्यापुढे ठेवीत आहोंत. हा संग्रह त्या घराण्यांतील विद्यमान वंशजांजवळ आजहि आहे. हें घराणें पैठण जवळील उपळायी गांवचें असून त्यास आळंदीस समाधीच्या प्राकारांत अध्ययन–अध्यापनास जागा व उपजीविकेकरिता संस्थानांतून नेमणूक करुन दिलेली आजहि ते लोक अनुभवीत आहेत. वाजसनेयी शाखेंतील पितळे उपनामक पढिक पंडिताची या कामीं योजना झाली व त्यांच्या घराण्यांत सदरचीं टांचणें व एकोबाकृत संस्करणावरुन नकललेली ज्ञानदेवी अजूनहि मोठ्या सुरक्षितपणें जपून ठेविलेली आळंदीस आहे.

त्यांच्या टांचणांत त्यांस एकोबांनी दिलेल्या अर्थास सिद्ध करणारे अनेक कोशांचे दाखले दिलेले आहेत त्यांची तेथे नमूद केलेलीं नांवें खाली वर्णानुक्रमाप्रमाणे देतों. त्यांवरून त्यांचा शब्द संग्रहांचा दांडगा परिचय निदर्शनास चांगलाच येतो. १ अमर, २ उत्पल, ३ चंद्रगोमी, ४ त्रिकाण्डमण्डन, ५ दंड, ६ द्विरूपि, ७ धन्वन्तरी, ८ धनंजय, ९ धरणि, १० मेदिनी, ११ रत्न, १२ रभस, १३ विश्व, १४ वैजयन्ती, १५ संसारावर्त, १६ हलायुध, १७ हारावली, १८ हैम, १९ विश्वमेदिनि, २० केशरमाला. अशा वीस कोशांतील उतारे देऊन, दिलेल्या अर्थाच्या अचूकतेची खातरजमा केली आहे. ऑफ्रिटच्या सूचींत सांपडणाऱ्या सर्व संस्कृत कोशांची यादी महाराष्ट्र कोशाच्या प्रथम विभागाच्या प्रस्तावनेंतील पान शेहेचाळीसमध्ये उद्धृत केलेली आहे. तींत हे सर्व सांपडतात. तेथे यांच्या कर्त्यांचीं नांवें व त्यांचा ज्या ग्रंथांत उल्लेख आला आहे अशांचींहि नांवें दिलेलीं आहेत. त्यावरून त्यांच्या अस्तित्वाची तरी निश्चिति होते. ह्या कोशांच्या वापरणारांनी त्यांच्या नांवांत प्रचाराने पडलेला फरक जमेस धरून आढळलेलीं नांवेंही नोंदलीं आहेत. या प्रत्येक कोशाचें स्वतंत्र वैशिष्ट्य आहे. त्या सर्वांचा एकोबांनी समयोचित समाचार घेतल्याचें यावरूनच समजून येतें. या सर्व प्रचंड प्रयत्नावरून टांचणाच्या काटेकोरपणाची पुरी खात्री पटते, व त्यावरून निष्पादिलेले अर्थ सर्वांहूनही अधिक संग्राह्य वाटतात.

या टांचणामुळे एकोबांनी संस्करण करून प्रकाशिलेल्या ज्ञानदेवीच्या प्रतीचे पाठ काय आहेत ते उद्धृत केलेल्या शब्दांपुरते तरी निवडून निघतात. प्रचलित प्रसिद्ध प्रतींतून प्रकाशांत आलेले पाठ व यांत दिलेले पाठ व त्यावरून यांनी व त्यांनी साधिलेली शब्दसिद्धि व अर्थसिद्धि यांतील ग्राह्याग्राह्यतेचे कस तरी अजमावतां येतात. पाठांचे प्रकार, स्वरूपांतील रूपांतरांचीं कारणें, व्याकरण व वाक्यप्रचार यांनीं रूढोचारांत अगर लिखाणांत धरून घेणारा फेरबदल इत्यादि महत्त्वाच्या मुद्यांवर प्रकाश पाडण्यास योग्य अशी सामग्री अभ्यासूंस याने उपलब्ध झाली आहे. हातांत आलेल्या शतशब्दात्मक टांचणांत एकंदर वीस पाठभेद प्रचलितांहून फटकलेले असे आढळतात. त्यांची नोंद अध्यायांच्या अनुक्रमाप्रमाणे हजेरीस मांडूं. यांत ओव्यांच्या संख्येतही फरक पडलेला दिसून येतो.

( प्रचलित प्रत म्हणजे बंकटस्वामींची प्रत येथे गृहीत आहे. )

| प्रचलित पाठ | ओवी क्रमांक | नाथप्रत पाठ | ओवी क्रमांक | अधिक शेरा |
|---|---|---|---|---|
| (१) महाबोधें विहार | ५–१३७ | विकार | ५–१३८ | राजवाडे पाठ नाथांसारखा |
| (२) चोखडी घोटींव | ६–२२४ | गाठी | —— | राज. पाठ खोटी |
| (३) आणिकणांचा आपैसा | ९–४५ | अवकणांचा | —— | राज. तोच |
| (४) ते सहसा कैसे कायी | ११–३१ | साध्वसे | ११–३० | |
| (५) मिडगणे जे | १३–३१९ | मिडगणेसी | १३–३१८ | |
| (६) शिरोभागीं कंप | १३–७५६ | बागीवळ | १३–७५५ | राज. तोच |
| (७) स्वेदज प्रभृति | १३–९१६ | प्रभूति | १३–९१६ | |
| (८) प्रवळला चौमेरी | १५–५८ | बल्वज | —— | राज. बल्वचेन |
| (९) हरीमेखळे | १५–२४१ | हरिमेखला | —— | |
| (१०) उपायीं जाचतया | १५–२५३ | जचे | —— | |
| (११) कुमारु क्रोधें | १६–१२८ | कुमारक्रोध | —— | |
| (१२) गौरवामाजी | १६–२३३ | गोरवा | —— | राज. तोच |
| (१३) सर्पाचीं कुटी | १६–२४३ | फटी | —— | |
| (१४) व्यास सहोदरु गुरुत्वें | १७–४३० | सहोदरगुरु | १७–४२८ | |
| (१५) म्हणोनि | १७–४३० | हणा | १७–४२८ | |
| (१६) अन्नलाभे अरुवार | १८–१४२ | आखरे | —— | |
| (१७) मिथ्याचे माहिखळी | १८–५४१ | मेखळी | —— | |
| (१८) जुंवागचे टीटेवर | १८–६७३ | टिटेघरीं | —— | |
| (१९) दुर्व्यवहारीं जैसी | १८–६८१ | दूहवेवारी | —— | राज. तोच |
| (२०) सिसे वेची तया मविली । वही— | १८–९१२ | सिसे दिल्हा तेणें सिव साधली | —— —— | |

शंभर शब्दांत वीस पाठभेदांचीं स्थळें आलेलीं आहेत. त्यांपैकी सात पाठ राजवाडे प्रतीशीं जुळतात; हें लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. वरील तुलना करितांना बंकटस्वामींची प्रत प्रथम घेऊन नंतर पाठ दिले. यांतील अवकण, साध्वस व बागीवळ वगैरे पाठ कोशोक्त अर्थ-दृष्टीने सरस वाटतात. जचे, टिटेघरी व दुहवेवारी हे व्याकरणदृष्टया अधिक पसंत पडतात इत्यादि विशेष विशेषतः मानवले, तरी चिकित्सेच्या निकषावर घासूनच त्यांस उजळा लाभणार आहे हें निर्विवाद होय. गोरवा व गौरवा या सारखे वाचकवृंदाचे, कुटी व फटी असे अनर्थज्ञा-कडून झालेले अनेक प्रकार होतात. त्याच्या विस्ताराचा विचार व्यवस्थिपणें स्वतंत्रच व्हावयास पाहिजे येवढें खरें.

सांगण्यासारखें दुसरें यांतील वैशिष्टय हें की प्रचलित प्रसिद्ध प्रकाशित पुस्तकांतील ओवीसंख्येशीं, नाथांनी संस्करण केलेल्या प्रतींतील ओव्यांच्या संख्येचाही, ब-याच स्थळीं मेळ

बसत नाही. नाथांच्या टांचणांत ज्या ओवीचा जो अध्यायवार क्रमांक दिला, तो प्रचलितांत कांहीसा मागेपुढे झालेला दिसतो. तीं स्थलें स्थूलमानाने मोजलीं तर शंभरांत दहापर्यंत भरतात.

नाथांच्या टांचणांत फक्त शब्द व त्याचा अर्थ आणि त्यास आधार असलेले कोशांतील वाक्यखंड, येवढेंच दिलें आहे. अर्थात् ओवीचा क्रमांक आहेच. आम्हीं त्यांत व्याकरण, बंकट, राजवाडे वगैरेंचे अर्थ, व मिळेल तेथे ज्ञानेश, नाथ, तुका अगर इतर ह्यांचीं तत्पर वाक्यें दिलेलीं आहेत. त्यायोगें अर्थनिश्चितीस मदत मिळणार आहे. मूळांत अध्यायानुक्रमाने दिलेले शब्द येथे वर्णानुक्रमाने दिले आहेत. (येथे निवडक ५५ शब्द दिले आहेत—सं.)

१. अंक—पु. आधारशक्तीच्या अंकीं । ज्ञा. १२-५ अंको भूषा रूपकलक्ष्मसु । चित्रादौ नाटकाद्यंशे स्थानेक्रोडेऽन्तिकागसौ । रामा. मांडी, बं. आंकडा, छाप. व्यासाचा अंकु न वाहे । ज्ञा. १८–५२४. लॅ. अंकस् ग्री. ओग् कोस् २ चिन्ह

२. अधपली—क्रि. वि. अधपली तवके इंद्रिये धरिली । ज्ञा. १२-४६. अधः पलीपत्वपावेस्यात् । आधारचक्राच्या मूलबंधाने चिमटलेली. २ होरपळलेले. सं. अर्धतपन= अथपन. अधपणें, होरपळणें. बं.

३. अंबर—न. तेंचि रंगाथिलें अंबर । ज्ञा. १-६. सागर शोषोनि उधवला अंबरासी । ज्ञा. १-९०. आंधारेन खतलें अंबर । ज्ञा. १६-२७ अम्बरं वाससि व्योम्नि कार्पासेच सुगंधके । विश्व १ वस्त्र, आकाश २ फा. बळद.

४. अवोट—ना. तें लागलेसें अबोट चंदनाचें । ज्ञा. १५-३. शुभ्रचंदन. ब्रह्मलिंग विशुद्धंच अबोटं शुभ्रचंदनम् । रभसः । १ वि. बोट न लावलेलें २ स्त्री. अनामिका. बं. अखंडित लेप. रा. पांढऱ्याचें.

५. अमृत—न. १ अमृतें तरीचि मरीजे । जरी विखेसि सेविजे । ज्ञा. २-२२४. २ जेथ अमृताचीं कोठारें ज्ञा. ९-३२१. अमृतं यज्ञशेषेस्यात् पीयूषे सलिले घृते । अयाचितेच मोक्षेच ना धन्वन्तरिदेवयोः ।। मेदिनि. १ दूध, २ स्वर्गीय पेय, बं. ३ अयाचित अन्न.

६. अवकण—न. अवकणांचा आपैसा राशिवा जोडे । ज्ञा. ९-४५ कणोतिशुद्धे धान्यांशे । मेदिनि. दुसऱ्या मळणीचें धान्य. अव–अस–कण–धान्य.

७. अहाळबहाळ—क्रि. वि. तो मी येथें आहाळबाहळीं कांपे । ज्ञा. ११-३५१ घस्रो दिनाहनीवात्तु । अमर. १.४.२.—१ अहाळ ( अहन् )–दिवस, बाहळ ( व्यहन् )— रात्री. २ अत्यंत, फार. बं. संपूर्ण, विस्तीर्ण, पुरेपूर. जेही आपुला संभोग काळीं । परब्रह्म भोगिले आहाळबहाळी ।। शिशु० २ अहाळबहाळ सृष्टी दुमदुमीत. एक. भाग. ३-४८०.

८. आखरे—न. कां अन्नलाभें आखरे । रांधतिये उणे ।।–ज्ञा. १८-१४२ पाठ– अरुवार. आखरें आते बुरी । ज्ञा. १३.५५८ बं. रा. हसंत्यापाके अखरो । चंद्रगोभिन्. सं. अक्षर–अक्षय–प्रा. अक्खर गोठण, गांवची सीमा. पाठ=अरुवारु–कानडी–अरलु. फूलते अखरलु-काटकुळा, पातळ. पुष्पवत्, सुंदर, मृदु. बं. ज्ञा. १६-२२२ अक्षर, शब्द रा. मो.

९. आराम—पुं. असतां सर्व सुखाचा आरामु । ज्ञा. ९-६० आरामः स्यादुपवन कृत्रिमं वनमेव यत् । अमर २-४-२. १ बगीचा बं. २ सं. आ+ रम्, फा. आराम. २ विश्रांति घेणारा, उद्यान ( महा. ) कृष्णचरणीचा आराम । ए. रु. स्व. १-८६. विश्रांति. आराम रमवी जीव शिवासि । ए. रु. स्व. ३-६ उद्यान.

१०. कांव्ररुखें--न. संसार हें कावरुखें । झाड तैसें ॥ ज्ञा. १५-५२. का वृक्षे भंगुरे वामे क्षणिके नव वल्मिके । त्रिकांडमंडन. वांडगुळ. सं. किं+वृक्ष. आश्चर्यकारक. बं. सदा सफळ आंब्याचा रुख । त्यावरी उपजे कांवरुख । तो सफळींहि निष्फळ देख । ए. भा. २३-३३.

११. काश्मिरी--प्रभु काश्मिरी मुकें । ज्ञा. १३-११६७; काश्मिरी न करावी मिड-गणेसि ११-३१८; पै काश्मीराचा खा । ज्ञा. १५-३४९. काश्मीरं पुष्पजातौ तु भाषायां देवयोषिता । हैमः. कश्मीरेपुभवम् । रामा. काश्मीरं कुंकुमेऽपिस्यात् टंकपुष्करमूलयोः । मेदिनि. काश्मीर देशासंबंधी, केशर, साल; स्त्री. वाग्देवता; न. स्फटिक, काश्मिरी-सरस्वति बं. ह. ३-१५५; ३४-१५०.

१२. कुरुठा--वि. यांचा पहिला कुरुठा इंद्रियें । ज्ञा. ३-२६८. जे ज्ञानाचा कुरुठा । ज्ञा. ४-१६६. २ विद्या देऊनि कुरुठा केला । १-९५. शहाणा. कुरुठं भाण्डारगृहम् । १ घर, घरटें (पक्ष्याचें), आश्रयस्थान, संग्रहालय. ३ पक्षिणीचा कुरुठा । वि. पू. १-१-१. अनंगाचा कुरुठा. शिशु. ४६ धनुर्विद्येचा कुरुठा । कथा. ५.११. १०७.

१३. कैंकाणें--न. घेऊनि इंद्रियांचीं कैंकाणें । ज्ञा. १८-४६४. जुंपायाचीं नांवें--धान्याध्यंगे युगः पुंसि कैंकणं संनिधापनम् । वैजयन्ति. दोरखंड; दौड, धांव; समुदाय बं.

१४. खवणे--येन्हवी तरी खवणेयाच्या गावीं । ज्ञा. ४-२२ खवणे याच्या अंगा । अमृ. ३४६. नग्नः क्षपणकः । सं. क्षपण, प्रा. खवण, अपरिग्रही नग्न भिक्षु, खवणादिगंवर बं.

१५. गोखा--गोखा तूंचि मीनलासी काळु । ज्ञा. ११-३८९ गोखामाजी लाये भंगितसे । १६-२३३. गोखा पतंगे मुदिरे मिहिरक्रमिमूर्खयोः । धन्वन्तरि. अविचारी, मध्येंच वं. मध्यवर्ति लोकांस रा. घोष-वारंवार घोकणें मो. झरोखा-सं. गवाक्ष प्रा. गवख्ख. गोख-मध्यभाग म.

१६. गोरि--गोरियेचें स्वभावगायन जें । ज्ञा. ८-१४८ गोरिकीर काना गोड ज्ञा. १६-१२० व्याधो मृगवधाजीवो गोरीत्यापहति इति । रत्न. फासेपारधी. गायनाचा एक प्रकार. कां गोरीचिया भुली १३-७३९. कीं गोरियेचें गायन । रा. वि. २.२३; पारधी घाट वाये । साधावया गोरी गाये. ज्ञा. प्र. ७२०.

१७. चाम--पु. तया चामासाठी चालती सकल वस्तु । ज्ञा. ९-४५३. सुवर्णं कनकं रुक्मं शातकुंभंच काञ्चनम् । जाम्बूनदं जातरूपं हिरण्यं हेम हाटकम् । चामीकरंच चारुत्वं तपनीयंच तापनम् । श्रीकेतनं भूषणार्हं चारुरूपंच तत्स्मृतः । चमीकरस्स्वर्णकरस्तद्भवं चाम-मुच्यते । Cf अमर २-९-९५. एक नाणें. १ आणा = ३० दाम, एक-दाम = ३० चाम. राजावळीच्या ठशाचा होन. राजा करी दाम । तरि ते चाम चालती ॥ तु. येर वेझ्या पोट-भरी । मसक चामाचिया परी । तु. घातला चामाचा भोकसा । ए. भा. ७.५८

१८. टिटेघर--तें जिणे कीं जुवाराचे टिटेघरीं । ज्ञा. १८.६७३ टीटं किण्वं नग्नहूः प्राहुः । चंद्रगोमिः अमर. २-१०-४२ नाना द्रव्यकृत सुराबीजस्य । रामा. तांदुळाचें सुराबीज; गुत्ता. तिवाठ्यावरील घर बं.

१९. त्रिदाह--पु. त्रिदाह निमालिया अंतर । ज्ञा. १६.४३८ मो. त्रिदाष. तापत्रय. सं. त्रि + दाह. अधिभूतादि तीन ताप.

२०. थळीव--न. परी कापूराचें थळीव । आणून देईल देव । ज्ञा.१७-३४५; कापु-राचें थळीव । अमृ. १०६ नाडींधमः स्वर्णकारः कलादो रुक्मकारके । अमर. २. १०. ८

तत्कर्म तु थलं ज्ञेयं शायकं कार्पणस्तथा । रामा. अलंकार कोरीव काम, याच्या ऊलट ' वेटीव ' म्ह. पत्र्यावरील ठसा.

२१. दुहवेवारी –– वि. दुहवेवारी जैसी । विटाळे लोटे ॥ ज्ञा. १८-६८१. दोहदो गर्भलक्षणे । अभिलाषे तथा गर्भे । हेमः । दोहदवती–दोहदं गर्भिण्यभिलाषोऽस्त्यस्याः मतुप्. रामा. २–६–२१ गर्भवती.

२२. धर्मधेनु —स्त्री. धर्मधेनु खुरपें । सुटलें जैसें ॥ ज्ञा. १६–३२९. सुधोद्भवा धर्मधेनु दूर्वातु चिरजीविनी । हेमः हरळी. सुधा–अमृतं तदुद्भवा–सहजे दूवचा डिरु । आंगें तव अमरु । वरी आला पुरु । पीयूषाचा ॥ ज्ञा. १४–२८ पहा–पराठी भाषेचा नवीन कोश र. भा. गडबोले कृत इ. स. १८७० ग. सॅ. बुक डेपो. दूर्वा.

२३. धुंधुरु —पु. आवडे तेसणा धुंधुरू । ज्ञा. ९–९ खद्योतो धुंधुरु ज्योति रिङ्गणो रात्रिदीपकः । रत्न. धुंधुमारो रक्तवर्णः कीटकेच्च निगद्यते । शब्दरत्नकोश. सं. इंद्रगोप. १. काजवा, २. दिवटीचा पोत.

२४. निगळ—न. डोळिया वरिलें निगळें । ज्ञा. १३–७५३. निगलं मलनेत्रयोः । उत्पल. डोळ्यांचें चिपड.

२५. पतिकर —गुणांचे नि पतिकरे । ज्ञा. २–१९३. ऐसा पतिकराचिया तोषा आंतु । १०–२०५. प्रतीतिगत जो पतिकरु । ११–२९ प्रियंवदः प्रीतिकरः । हेमः प्रेमकरणारा २ आवड.

२६. पाटाउ —पु. पाटाउवे काय करावीं । ज्ञा. ४. २२. वाचोयुक्तिः पटुर्वाग्मी । अमर ३–१–३५ पटुर्दक्षेच नीरोगे चतुरेऽप्यभिधेयवत् । मेदिनि. पाटव्यं पटोर्भावः पाट्यां श्रुतिवाक्यम् । १ वेदाक्षर २ रेशमी वस्त्र: ( पट )

२७. पाढाउ —पु. गीतादर्शनाचा पाढाउ जो । ज्ञा. १८–३०. ग्रन्थे तु पाठ-पाढावौ । हेमः बोधक, वाटाड्या, मार्गदर्शक.

२८. पुण्यजन —पु. न ह्मणेजे पुण्यजनु । राक्षसु कायी ? ॥ ज्ञा. १८–७५० यातुधानः पुण्यजनो । अमर १–१–६०. राक्षस.

२९. फटा —स्त्री. मनसर्पाची फटी । ज्ञा. १६–२४३. फटायां तु फणाद्वयोः । अमर १–८–९. फणि, सर्पाची फडा.

३०. वल्वज—पु. प्रबळला चौमेरी । वल्वजाचिये परी । ज्ञा. १५–५८ उलपा बल्वजा प्रोक्ता । शाखादिभिः विस्तृतवल्ल्याया: रामा. अमर २–४–९ दृढ, विस्तृत वेली, बोंडगुळ.

३१. बागीबळ—न. मस्तक आदरी शिरो- । बागीबळ । ज्ञा. १३–७५६ पलितं जरसा शौक्ल्यं बागीवलजरेतिच । धनंजयः जरा, म्हातारपण, शुभ्रकेश.

३२. माहेवणी—स्त्री. माहेवणी प्रयत्नेसी । ज्ञा. १८–८८६ माहेवणी पापिये । १६–१४४. ( मायवणी–गरोदर ) महिला हत्तिणीचीं नांवें —इभि माहेवणी चैव वासिता करिणी स्त्रियाम् । रत्न. हत्तींतील मादी ( माहवणी–रजस्वला )

३३. मांदुरी—पु. मांदुरी लोकांचा घोडा । ज्ञा. १६–२२५ मंदुरा वाजिशालायां शयनीयार्थवस्तुनि । वाजिशाला तु मंदुरा । अमर २–२–७. तबेल्यांतील ठाणबंदी.

३४. मिडगण—स्त्री. काश्मिरी न करावी । मिडगणेसी । ज्ञा. १३–३१८. मिडगणं स्तवनं स्तोत्रम् । संसारावर्त. स्तुति

३५. मेखळी—बाहेरी मिथ्याचे मेखळी । ज्ञा. १८-५४१ मेखला तन्निबंधनम् । अमर. २-८-९०. कंबरकसणीचा शेला.

३६. वही—स्त्री. सिसे वेचितया मविली वही । ज्ञा. १८-९१२ न सरे द्वैताची वही । १३-९३८ सिसे दिल्हा तेणे सिव साधली । शीव.

३७. वानिवसा —पु. न. ते वानवसा आंधळें जैसें ठाके । ज्ञा. १७-१०२ मध्यगृहे वन्हिवासः । मध्यघर. वानिवसे वन्हि लागला । १-२५८ वळचण.

३८. वामांगी—स्त्री. वामांगीचा लास्यविलासु । ज्ञा. १७-८ वामं सव्यो प्रतीपेच द्रविणे चातिसुंदरे । पयोधरे हरे कामे विद्याद्वामपि स्त्रियाम् ॥ विश्व. वाम=शिव त्याच्या डाव्या अर्ध्या अंगाची झालेली जी ती पार्वति.

३९. वार्ता—स्त्री. वार्तेवरील धावणें. १८-६४ वार्ता वार्तिङ्गणे वृत्तौ वार्ताकृष्यादुदंतयोः । वृत्तिमान्निजसो वार्ता वार्तमारोग्यफल्गुना । विश्व. दोर. पंचतत्त्वीं जडियेले वारतिया चहुकोणा । मदलसा. तु. ३६०१

४०. वावदळ—वावदळ पडोनि ठाये । ज्ञा. १७-१४३ वावंदळस्तु दंतानां भंगे पतनवासपि । चंद्रगोमि.

४१. विसुरा—पु. म्हणोनि विसुरा काय येयें । ज्ञा. ५-१७४ परिणामाचा विसुरा । १७-१५२ जे ते विश्वालंकाराचे विसुरे । ६-९८ परि तमाचा विसुरा । न जोडेचि दिनकरा । अमृ. ६८१ विसृत्वरा विसृमरः प्रसारीच विसारिणि । अमर ३-१-३१ प्रसार करणें. फुन सदा विसुरा करि थोरु । शिशु. २६५

४२. वेसजे—स्त्री. जगें हें वेसजेवीण असें तया । ज्ञा. ६-११० पांडिस्यें येतीं वेसजे । १८-१७४५ वेसवार उपस्करः । अमर २-६-३५ वेसं प्रेरणम् । रामा. वेसजं धान्यजाति स्यात् परिक्रीतयवस्तुषः । उत्पल. सं. विशुद्धि प्रा. 'विसुज्झि, प्रेरणा.' प्रकाश.

४३. वोभाण—न-कर्माकर्माचीं वोभाणें । ज्ञा. ७-७३, असुनी न धरिती वोभाणे । ७-८१ श्रुति सदा वोवाणे । १३-१४ पिकली दति आर्दरें । वोवात निघे । १३-३०४ स्वरं बोभाषणं तुष्यद् बोभणं स्यंदनध्वनिः । हारावलि. वोभायिलिया चोहटां । १६-२१९ मोठ्यानें घोष ( करणें ) बोभाट.

४४. व्यास सहोदर—व्यास सहोदर गुरु होय । ज्ञा. १७-४३० विस्तारो विग्रहो व्यासः स च शब्दस्य विस्तरः । अमर ३-२-२२ युद्ध गुरुत्वें होय व बंधुत्वें होय । फेडितां बंधनाचा ठावो । तूं जगद्‌बंधु ऐसा भावो । ज्ञा. १७-१०

४५. सपातळ—वि. नव्हे सपातळ आड लावणें । ज्ञा. ६.११४ सप्रलंस्यात् प्रतिसिरा प्रातिसीरा जवनिका । अमर २-६-१२०. पडदा.

४६. सपिली—क्रि. वि. विकारांची सपिली बोहिली । ज्ञा. ९ २१५. हें मानी तो सपिली । मुकला जेवी । १३-७६५. चिल्लःखगे सचुल्लश्च पिल्लवत् । हेम, निःशेषंतु सपेलकम् उत्पल. सं. स + पिल्ल. चिलीपिलीयांसह सर्वच.

४७. सवेसा—स्त्री. तरी आपुलिया सवेसा ज्ञा. ३-२६ समर्याद सवेशवत् । अमर ३-१-६७, समाना मर्यादाऽस्य समानो वेस्मोऽस्य. रामा. ( सं. स्व+इच्छा स्वेच्छा ? ) मर्यादेसारखा.

४८. सहान—स्त्री. न. काय कामधेनु सवे सर्व सहान। चालतसे। ज्ञा. १०–३०९. साधनं मृतसंस्कारे सैन्ये सिद्धौषधे गतौ। निर्वर्तनोपाय मेंद्र दापनेऽनुगमे धने ॥ मेदिनी. साधन, सामग्री, संपत्ति.

४९. सात–वेउळी—पु. शेळिये सात–वेउळी मिळे। ज्ञा. १६–२५९ ना वेउळी वृश्चिक लांगले। सत्तध्वनिरूपः व्याघ्रशालावृकवलीमुखः। रमस. पांचे–वेउळी १३–१०७० वेउळ–लांडगा हिंस्र पशु. "वाघ वेऊळ कोल्हा कावळा' पं. तंत्र ३९–४१.

५०. साधीन—आणी मृगातें बुद्धि। साधावया ॥ ज्ञा. ३–२१६ हे शस्त्रेंवीण साधिती। ३–२५८ आणिकही साधीन गाढ। १६–३५२ साधनं मृतसंस्कारे. साध्–नाश करणें. मारीन.

५१. सिसे—सिसे वेचितया मविली। १८–९१२ कां शीस खांडोनि आपुले ज्ञा. ९–५००. उत्तमांगं शिरः शीर्षम्। अमर २–६–९५. मस्तक (तृ)

५२. सुहाडा—पु. साम्यतेचि सुहाडा वेदी जाणे। ज्ञा. ९–२४१ आथिके द्वार–कापुर सुहाडा। ११. ६७० विषयींची सुहाडा। ज्ञा. १६. ३१५ तमक्षेत्रीं सुहाडा पेरिती। ज्ञा. १७–९९ इनं प्रभुर्नृपोराजा सुहाडाः। पृथिवीपतिः। हलायुध. राजा वैराग्याचिया पाखरा सुहाडा.

५३. सांवरे—न. चंद्र शिंपे सांवरें। ज्ञा. ९–३२४ अंभोर्णस्तोयपानीयनीरक्षारांम्बु शम्बरम्। अमर १–९–४. सं. शंवर. पाणी. सडासंमार्जन.

५४. हरिमेखला—लाघवी हारिमेखले लोकु जैसा। ज्ञा. १५–२४१. इच्छा तु हरिमेखला। त्रिकांडमंडन। लावकी–जादुगार. जादूकरितां नजरबंदीनें जगास आपल्या इच्छेनुरूप चकवितो.

५५. क्षमा—स्त्री. असंमोह सहनसिद्धी –। क्षमा सत्य। ज्ञा. १०–८३. सर्व सहातिया गरिमा। गर्वा न ये तेचि क्षमा। आधारु झाली या भूतग्रामा। ११–५५९ क्षितिक्षान्त्योः क्षमा युक्तेक्षमं शक्ते हिते त्रिषु। अमर ३–३–१४२. १ सहनशीलता, २ पृथ्वी. क्षमी–समर्थ–ज्ञा. १६–४७०.

यांत व्याकरणाच्या संज्ञा, समानार्थक ग्रंथकर्त्यांचे व अन्यांचे उतारे हे आमचे आहेत. त्यांचे क्रमांकहि वंकटस्वामी प्रतीस अनुसरून आहेत. महाराष्ट्रकोश आपटे व ओक ह्यांचाहि व्युत्पत्तिकोशास यथायोग्य, जरूरीप्रमाणे, उपयोग करून घेतला आहे. त्या सर्वांचा मी आभारी आहें. यांतील क्रमांप्रमाणे पहिली ओवी, पहिल्या कोशाचा उतारा व अर्थ आणि क्रमांक हीं मात्र मला नाथांच्या टांचणाच्या नकलेवरून मिळालेलीं आहेत. या प्राचीन प्रयत्नांचा हा प्रकार खरोखरी फार प्रशंसनीय आहे. या पद्धतीप्रमाणे ज्ञानदेवीमधील सर्व शब्दांची व्यवस्था व्हावयास पाहिजे.

———

# कांहीं व्युत्पत्तिविचार

## ले. श्री. ग. ह. खरे

(१) (अ) कर्नाटक आणि कर्नाटकच्या लगतचा महाराष्ट्राचा भाग यांतील कित्येक गांवांचीं नांवें द्विपदी असून उत्तरपद कोल–खोल–गोल–घोल यांपैकी एखादें असतें, आणि कांहीं ठिकाणीं अंत्य ल ऐवजी ळ येतो. (आ) कांहीं ठिकाणीं गांवांचा समूह व्यक्त करण्यासाठी या उत्तरपदाचा उपयोग होतो. (इ) कांहीं ग्रामनामांत पूर्वपदाच्या जागींहि हा शब्द येतो. (ई) यांच्या प्राचीन रूपांत ल अथवा ळ यास प्रायःद्वित्व दिलेलें आढळतें. उदाहरणें:–

सातारा :–विनेखोल, लुमणखोल (गांवें), नागेखोल–ळ (ग्रामसमूह); कुलाबा :–कासेखोल, उतेखोल (गांवें); रत्नागिरी :–अंबेखोल (गांव), तेरेखोल (नदी व किल्ला), मुदखोल (गांव); कडवाड :–भैतखोल, वीरखोल (गांवें); विजापूर :–सिद्धनकोल्ल; धारवाड :–अल्लिकोल्ल, कोल्हापुर; बेळगांव :–कटकोळ, अनिगोळ, केमनकोल; शिवाय हुइलगोळ, अमरगोळ, कडकोळ इत्यादि नांवें. प्राचीन शिलालेखांत खोल्ल शब्द खोरें व त्यांतील ग्रामसमूह या अर्थानें वापरलेला वारुळेखोल्ल, आजिरगेखोल्ल, पणतुरगे–गोल्ल यांत आला आहे.

(२) कानडीमध्ये कोळ (को ऱ्हस्व) असा धातु असून त्याचे अर्थ धरणें, पकडणें, स्वीकारणें, मिळविणें असे आहेत. यावरून जेथे पाणी पकडलें, स्वीकारलें, सांठविलें जातें, त्यास म्हणजे तळें, डबकें, इत्यादि छोट्या जलाशयांना कोळ (को ऱ्हस्व) हा शब्द लावतात. मूलतः त्याचा अर्थ खळगा, खाच असा असावा. वर जीं ग्रामनामें दिलीं आहेत त्यांचें उत्तरपद बहुधा या कोळ शब्दापासून झालें असावें. त्यांचे सांप्रतचे शुद्ध उच्चार व प्राचीन रूपें माहीत नसल्यानें ग्वाही देतां येत नाही.

(३) कानडीमध्ये कोळ्ळ असा दुसरा शब्द असून त्याचे अर्थ खोल जागा, खोली, गभीरता, खडकांतील चीर किंवा भेग, गुहा इत्यादि किटेलने आपल्या कोशांत दिले आहेत. हा शब्द बराच जुना आहे. केशिराजाच्या शब्दमणिदर्पणांतील (इ. १२६०) नामप्रकरणामध्ये एका सूत्रांत कोळ्ळ या नामाचा उल्लेख आहे. कोळ्ळचें गोळ्ळ रूप होणें जसें साहाजिक तसेंच खोळ्ळ व घोळ्ळ हीं रूपें होणेंहि साहाजिक आहे. या शब्दाचें सुलभीकरण होतांना गोल–गोळ, घोल–घोळ अशीं त्रिमात्रिक अर्वाचीन रूपें बनलीं. पैकी ळयुक्त रूपें प्रायः कानडींत तर लयुक्त रूपें मराठींत राहिलीं.

(४) कोळ काय किंवा कोळ्ळ काय, दोन्ही शब्दांच्या अर्थामध्ये मूळ कल्पना खोल जागा, खाचर, तळें व चीर, भेग, चिंचोळी, खोली, खोरें अशा दोन आहेत. हे शब्द ज्या गांवाशीं संबद्ध आहेत, तेथे वरील सर्व वस्तुस्थिति असावी, व तीवरून विशिष्ट ग्रामनामें तयार झालीं असावीं. विशेषतः सिद्धनकोल्ल, केमनकोल्ल इत्यादि नांवांत पूर्वपद षष्ठ्यंत असल्याने वरील संभव अधिक सुव्यक्त होतो. हीं गांवें वसण्यापूर्वी तें विशिष्ट तळें, खाचर वा खळगा कोणातरी व्यक्तीच्या किंवा व्यक्तिसमूहाच्या मालकीचा असावा, तेथे वस्ती झाल्यावर त्या जागेचें पूर्ण नांव त्या वसतीस मिळालें असें दिसतें.*

---

* श्री. ग. ह. खरे यांच्या मूळ लेखांतील महत्त्वाचा भाग संक्षिप्त करून येथे दिला आहे. (संपादक)

# परीक्षणें

आचार्य बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचें जीवनवृत्त व लेखसंग्रह, खंड १–४; (शताब्दि–स्मारक–ग्रंथ)—संशोधक व संपादक–ग. गं. जांभेकर. १९६५ सदाशिव, पुणें ४. किं. रु. ५०.

प्रस्तुत ग्रंथाच्या चार खंडांचा निर्देश वर केला असला तरी आज आमच्यासमोर त्याचे आजवर प्रसिद्ध झालेले तीनच खंड आहेत. अर्थात् पुढील मजकूर या पहिल्या तीन खंडांनाच अनुलक्षून आहे हें निराळें सांगणें नकोच. ग्रंथ प्रसिद्ध होत असतांनाच मोठमोठ्या मंडळींचे अभिप्राय मिळवून संपादकांनी ते ग्रंथारंभींच जोडले असल्यामुळे क्षणभर असेंहि वाटण्याचा संभव आहे की यांपुढे इतरांना अभिप्राय लिहिण्यास अवकाश व तशी आवश्यकता तरी उरतेच कुठे ! परंतु पुस्तकांतच संग्रहित केलेले वरील अभिप्राय पुरस्कारार्थ आहेत असें मानून पुढील चार शब्द लिहिण्यास आम्ही धजत आहोंत.

वरील तीन खंडांपैकी पहिला खंड आत्मनिवेदन, आचार्य बा. गं. जांभेकर यांचें जीवनवृत्त व कार्य आणि शेवटचा उपोद्घात म्हणजेच गेल्या शंभर वर्षांतील चरित्र–साहित्याचें सिंहावलोकन यांनी व्यापला असून, दुसऱ्या खंडांत चरित्रनायकाच्या इंग्रजी व मराठी लेखनापैकी निवडक लेख संग्रहित केले आहेत. नंतरच्या म्हणजे तिसऱ्या खंडामध्ये चरित्रसाहित्याचें संकलन चरित्रलेखकाच्या टीकेसहित समाविष्ट केलेलें आहे.

या तीन खंडांपैकी पहिल्या खंडाचे पुन्हा तीन विभाग पाडले असून त्यांतील ६४ पानांचा पहिला विभाग आचार्यांचें चरित्र, मराठी जाणणाऱ्या अन्यभाषीयांकरिता इंग्रजी भाषेंतून देण्याकरिता खर्ची घातला आहे. दुसऱ्या विभागाच्या प्रारंभीं थोडेसें आत्मनिवेदन करून पुढे चरित्रनायकाचें जीवनवृत्त व कार्य यांची माहिती मराठींतून १०९ (= १३) ते १५३ (= ५६) या ४३ पानांत समाविष्ट केली आहे. प्रथमखंडाच्या शेवटच्या म्हणजे तिसऱ्या विभागांत 'उपोद्घात' या शीर्षकाखाली 'चरित्रसाहित्याचें सिंहावलोकन" स्वतंत्रपणें करण्यांत आलेलें आहे. वास्तविक पाहातां हें सिंहावलोकन तिसऱ्या खंडानंतर येणें सयुक्तिक ठरलें असतें. परंतु लेखकानें मात्र पहिल्याच खंडांत त्याचा समावेश केला आहे.

मराठींतील जीवनवृत्तांत केवळ ४३ पानांतच आटोपला आहे, या वरील उल्लेखावरून असा विचार स्वाभाविकपणेंच मनांत उद्भवेल की चरित्रनायकाचें चरित्र इतक्या थोडक्या जागेंतच संपविल्यानंतर उरलेलें अवडंबर प्रस्तुत चरित्रलेखकानें मांडलेंच कशाकरिता ? वास्तविक प्रस्तुत चरित्र हा एक पहिला व म्हणून महत्वाचा असा उपक्रम आहे. अधिक विस्तृत चरित्र कदाचित् यावरूनच प्रेरणा घेऊन किंवा स्वतंत्रपणें पुढे मागे लिहिलें जाईल. केवळ चरित्रलेखन हा या खंडांचा प्रमुख उद्देशच नव्हे. इंग्रजी राजवटीच्या प्रारंभींच्या कालांतील पश्चिम हिंदुस्थानांतील पहिले प्राध्यापक, भाषाकोविद, पुराणेतिहासज्ञ व संशोधक, तसेंच पहिले समाजसुधारक व आद्य इंग्रजी–मराठी पत्रकार या नात्यानें अव्वल इंग्रजींतील मुंबईतले, किंबहुना महाराष्ट्रांतले, एक लोकोत्तर पुरुष म्हणून आचार्य जांभेकरांची थोरवी फार मोठी आहे. परंतु त्यांच्या जीवनकार्याकडे महाराष्ट्राचें फारसें लक्ष न गेल्यामुळे या त्यांच्या थोरवीची जाणीव महाराष्ट्रीयांना यथायोग्य प्रकारें झालेली नाही. ही अनास्था दूर करून आचार्यांच्या

अनुक्रमणिका

महान् कार्याकडे महाराष्ट्रीयांचें लक्ष वेधून त्यांना त्यांच्या योग्यतेची जाणीव करून द्यावी व आचार्यांचें यथायोग्य स्मारक करण्यास त्यांस प्रवृत्त करावें हा स्तुत्य उद्देश प्रस्तुत उपक्रमाच्या मुळाशीं आहे. चरित्रांतील बहुतेक विधानें साधार आहेत ही समाधानाची गोष्ट होय. शिवाय अधून मधून विध्यर्थी व संभाव्यतादर्शक विधानें आलीं असलीं, तरी त्यांनाहि विश्वसनीय ठरण्याइतपत तर्कप्रतिष्ठितता आहे असें म्हणणें अतिशयोक्त होणार नाही. इंग्रजी व मराठी या दोन भाषांत एकच मजकूर लिहिला असल्याने द्विरुक्तीचा व अकारण विस्ताराचा दोष लेखकाच्या पदरीं येतो हें खरें असलें, तरी इंग्रजींतील मजकूर मराठी न जाणणाऱ्या अन्यभाषीयांकरिता आहे असें मानल्यास या दोषाचा परिहार सहज होणार आहे.

पहिल्या खंडाचा तिसरा विभाग विस्ताराने सर्वांत मोठा असून त्याला तीव्रताहि फार आली आहे. वास्तविक आचार्य बाळशास्त्र्यांसारख्या १८५७ पूर्वी होऊन गेलेल्या व्यक्तीबद्दलचें अज्ञान हें "थोडेंबहुत अपरिहार्यच" नव्हे काय ! शिवाय मुंबईत कांही थोड्या वेळा त्यांच्या कामगिरीचें मूल्यमापन झालेलें असूनहि त्यांचें स्मारक करण्याची कल्पना एकाहि मुंबईकराला सुचली नाही यांतहि आश्चर्य तें कसलें ! न्यायमूर्ति म. गो. रानडे या थोर विद्वन्मणीचें तरी स्मारक, एक पुतळा व एक रस्ता सोडला तर, विद्यापीठांत किंवा मुंबईत इतरत्र तरी कोठें झालें आहे ? बाळशास्त्र्यांचें यथायोग्य स्मारक झालें पाहिजे याविषयी कोणाचेंच दुमत होण्याचें कारण नाही. ग्रंथकर्त्यांची तद्विषयक ज्वलंत पोटाग स्वाभाविक असून त्यासंबंधी ठिकठिकाणीं व्यक्त केलेला उत्साहहि यथायोग्य व स्वागतार्हच आहे. याच विभागांतील पुढील विवेचनांत योग्य माहिती न मिळवितां बाळशास्त्री यांजविषयी आजपर्यंतच्या महाराष्ट्रीय लेखकांनी जें लिखाण केलें आहे, त्यावरून त्या लेखकांचा समाचार लेखकाने घेतला आहे ! या विस्तृत व बोचक समाचाराने कित्येकांचें पित्त खवळेल यांत शंका नाही. परंतु आमच्या मराठी लेखकांचा भोंगळपणा, उथळपणा व ढोबळपणा, त्याचप्रमाणे त्यांच्यांतील चौकसपणा, बारकावा व रेखीवपणा यांचा अभाव, आणि कांटेकोर लेखनाविषयींची त्यांची एकंदर बेपर्वाई हे सर्वच दोष एकदा कोणी तरी पुढे येऊन जाहीर करणें अगत्याचेंच होतें. हें कटु पण अपरिहार्य कार्य या तिसऱ्या विभागाने केलें आहे हें निर्विवाद ! आता हें कार्य करण्याच्या प्रस्तुत विभागांतील पद्धतीच्या औचित्याविषयी वाचकांचा मतभेद होण्याचा संभव आहे हें खरें; किंबहुना हीच टीका इतक्या कडकपणें न करतां सौम्यपणाने व संयमाने केली असती तर बरें झालें असतें असेंच कोणीहि म्हणेल. परंतु जरा अधिक तीव्रतेने व थोडा संयम सोडून का होईना, परंतु हें कटु कार्य प्रस्तुत चरित्र-लेखकाने केलें, याकारिता त्याला शाबासकीच देणें योग्य ठरेल. अर्थातच ज्या ज्या स्थळीं ही टीका वैयक्तिक स्वरूप धारण करते, त्या त्या ठिकाणीं ती त्याज्यच होय हेंहि येथे नमूद केलेंच पाहिजे. कटु व बोचक विशेषणें, निंदावाचक दुःशब्द, अनाठायीं विपर्यांतर आणि 'शरम' सारखे कडक शब्द विषवत् मानून ते टीकाकाराने वर्ज्य केले पाहिजेत असा इशारा येथे देणें अपरिहार्य आहे. एक तर असेंहि वाटल्यावाचून राहात नाही की जें कार्य आपल्या या स्मारक-ग्रंथांनी व्हावें अशी लेखकाची सदिच्छा आहे तें प्रस्तुत तिसऱ्या विभागामुळे सिद्धीस तर जाणार नाहीच; उलट विपरीत परिणाम होण्याचाच संभव अधिक ! लेखकाच्या इष्टार्थाची सिद्धि सौम्य भाषेत केलेल्या टीकेच्या साहाय्यानेच अधिक चांगली झाली असती. लोकशिक्षणकारांविषयी आम्हांस वैयक्तिक माहिती फारशी नाही; तरीहि कांही ठिकाणीं केलेली वैयक्तिक टीका स्वतःच्या हेतूच्या सिद्ध्यर्थ तरी निदान लेखकाने करावयास नको होती असें

वाटल्यावाचून राहात नाही. अशा टीकेला उत्तरें देऊन ती खोडून काढण्याचें आम्हांला अर्थातच प्रयोजन नाही. ज्यांचा त्यांत संबंध येईल ते अवश्य तर व अवश्य तेव्हा हें कार्य वाटल्यास करतील. या विभागांतील कठोर टीकेने मराठी विद्वानांचें वस्त्रहरणच झालें असाहि गैरसमज करून घेण्याचें वास्तविक कांही कारण नाही.

या स्मारक ग्रंथाचा दुसरा खंड तत्कालीन लेखनपद्धति व वृत्तपत्रें यांच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचा आहे. यांतील सर्वच लेख बाळशास्त्र्यांचे आहेत असें मात्र निश्चयाने म्हणतां येणार नाही. प्रथम पाक्षिक म्हणून सुरू केलेल्या व पुढे साप्ताहिक बनलेल्या ' दर्पण ' या पत्रांतील इंग्रजी लेखन बहुतेक बाळशास्त्र्यांचेंच असलें, तरी त्याचा मराठी तर्जुमा मात्र बाळशास्त्र्यांचा नसून तो जनार्दन वासुदेवशास्त्री हे तयार करीत असत ( पृ. ११६, खंड १ ). यामुळेच दर्पणांतील मराठी भाषा इतिहासदृष्ट्या महत्त्वाची असली, तरी दर्पणांतील या मराठी लेखनाचा प्रत्यक्ष बाळशास्त्री यांशीं संबंध आहे असें मानतां येत नाही. उद्धृत केलेल्या इंग्रजी लेखांच्या द्वारें मात्र बाळ गंगाधरशास्त्री यांचें सौजन्य, कांटेकोरपणा, संपादकीय प्रामाणिकपणा, तसेंच त्यांची समाजसुधारणा व राजकीय सुधारणा एतद्विषयक दृष्टि यांविषयींचीं अनुमानें बांधण्यास पुरेल इतकी सामग्री लेखकाने वाचकांपुढे मांडली आहे. यावरून पहातां बाळशास्त्री यांचीं राजकीय मतें क्रांतिकारक वाटत नाहीत; त्याचप्रमाणे नंतरच्या काळांत लोकांच्या मनांत दृढमूल झालेली 'इंग्रजी राज्य म्हणजे देवाचा प्रसाद ' ही श्रद्धाहि त्यांच्यांत दिसत नाही. त्यांना इंग्रजांविषयी द्वेषहि नाही किंवा पारतंत्र्याच्या रागाचा कढहि नाही. ते देशभक्त नव्हते असा आमचा अभिप्राय नाही. चिपळूणकर किंवा टिळक यांच्या लेखांतील जहालपणा व स्वातंत्र्याची उत्कट व अमाप तळमळ त्यांच्या लेखनांत प्रतीत होत नाही इतकेंच आम्हांस म्हणावयाचें आहे. त्या काळच्या मर्यादा, बाळशास्त्र्यांना लाभलेलें अल्प आयुर्मान, त्यांची अनेककार्यव्यापृतता, इंग्रजी राज्याच्या प्रारंभींच्या काळांत नीट घडी बसविण्यांत व्यग्र झालेल्या राज्यकर्त्यांचीं वाघनखें तितकीशीं विदारक झालीं नव्हती, इत्यादि गोष्टी लक्षांत घेतां उत्कट तळमळीचा अभाव हा बाळशास्त्री यांच्या बाबतींत दोषार्ह ठरणार नाही. अर्थातच त्यांच्या लोकशिक्षणपर व इतर सार्वजनिक कार्याचा, त्यांच्या कर्तृत्वाचा व बुद्धिमत्तेचा व आद्य पत्रकार या नात्याचा योग्य गौरव केल्यानंतर त्यांच्या देशभक्तींत आज आम्हांस हवीशी वाटते तितकी उत्कटता नव्हती, या वस्तुस्थितीचा निर्देश करणें मुळींच अन्याय्य ठरणार नाही. अक्कलकोटास जातांना त्यांनी पत्करलेलें बंधनहि कांहीसें चमत्कारिक असलें, तरी त्याकरिता त्या काळाच्या मानाने त्यांना कोणीच दोष देणार नाही.

दुसऱ्या खंडाच्या दुसऱ्या विभागांत त्यांचे किरकोळ इंग्रजी लेख संकलित केलेले आहेत. दादोबांच्या व्याकरणावरील त्यांचा अभिप्राय सडेतोड, चिकित्सापूर्ण व न्याय्य आहे हें कोणीहि मान्य करील. त्यांतील सूक्ष्म परीक्षणावरून लेखकाच्या बुद्धिमत्तेचा स्पष्ट प्रत्यय चटकन येतो. या विभागांतील इतर कांही लेखनावरून तत्कालीन शैक्षणिक परिस्थितीचा उलगडा होतो हा त्यांचा विशेष होय. भावनगरच्या शाळेंतील प्रत्येक विद्यार्थ्याला रु. १८० वार्षिक फी म्हणून द्यावे लागत, ही माहिती जितकी विस्मयजनक तितकीच बहुमोल आहे. या विभागांत समाविष्ट केलेल्या ताम्रपटावरील टीकेवरून या थोर पुरुषाची ऐतिहासिक विवेचनशक्ति, सर्वंकष प्रज्ञा व स्वतंत्र विचारशक्ति यांची साक्ष पटते. आद्य पुराणशास्त्रज्ञ या नात्याने जांभेकरांची ओळख करून देणारा हा लेख अमूल्य आहे. श्री. ग. गं. जांभेकरांनी विस्मृतिपटलांत लुप्त

झालेली या थोर चरित्रनायकाची ही विशाल गुणवत्ता प्रकाशांत आणली यावद्दल प्रत्येक इतिहासज्ञ कृतज्ञच राहील.

खंड २, विभाग ३ मध्ये दिग्दर्शन मासिकांतील लेख संकलित केले आहेत. त्यांतील विविध विषयांवरचे सर्वच लेख बाळशास्त्र्यांचेच असतील किंवा कसें याविषयी स्वतः चरित्रलेखकानेच संशय व्यक्त केला आहे. परंतु त्यांतील बहुसंख्य लेख जांभेकरांखेरीज इतरांच्या लेखणींतून उतरण्याचा फारसा संभव नाही असेंच कोणासहि वाटेल. भूगोल, रसायन, सिद्धपदार्थविज्ञान, ज्योतिषशास्त्र इत्यादि विविध विषयांवरील हे लेख आज जरी प्राथमिक वाटले, तरी त्या काळीं त्यांचें महत्त्व अपूर्वच असलेंच पाहिजे. शिवाय तत्कालीन भाषेचें स्वरूप समजून घेण्यासहि तें एक उत्कृष्ट साधन आहे. ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे असे हे लेख ग्रंथरूपानें एकत्र करून संपादकाने मोठेंच कार्य साधलें आहे.

प्रत्यक्ष बाळशास्त्री यांच्या ग्रंथामधूनच उतारे ज्यांत उद्धृत केले आहेत, तो चौथा विभाग तर सर्वांत महत्त्वाचा आहे. माहितींतील बिनचूकपणा, प्रतिपादनाची वैशिष्ट्यपूर्ण शैली, विषय सुगम करण्याची हातोटी इत्यादि अनेक बहुमोल गुण यांत दृष्टोत्पत्तीस येतात. यामुळे हाच विभाग अधिक विस्तृत केला असता तर बरें झालें असतें असें वाटल्यावाचून राहात नाही. निदान त्यांचें बालव्याकरण तरी यांत उताऱ्यांच्या रूपानें न येतां संपूर्ण ग्रंथरूपाने आलें आहे ही त्यांतल्या त्यांत महत्त्वाची गोष्ट होय. यांतील शून्यलब्धिविषयक प्रकरणहि अत्यंत उद्बोधक आहे. त्या काळीं या विषयाचा नीट अभ्यास करून तो विषय मराठींतून मांडणाऱ्या या विद्वान् गृहस्थाची तारीफ करावी तेवढी थोडीच, त्यांच्या बुद्धिमत्तेचें कौतुक करावें तेवढें अल्पच, त्यांच्या शिक्षणविषयक चळवळीची प्रशंसा करावी तेवढी तोकडीच ! याहूनहि थक्क करणारें त्यांचें कार्य म्हणजे ज्ञानेश्वरीची पाठभेदांसहित काढलेली आवृत्ति. याकरिता तर त्यांचा किती म्हणून गौरव करावा ? खरोखरच महाराष्ट्रांतील शास्त्रशुद्ध विद्वत्तेचा पाया घालणारा लोकोत्तर व असाधारण विद्वान् प्राध्यापक म्हणून त्यांचें नांव प्रातःस्मरणीयांत गणावें लागेल.

या ग्रंथांचा तिसरा खंडहि कांही दृष्ट्या अपूर्व आहे. चरित्रविषयक अस्सल पुरावा, बाळशास्त्र्यांचें इंग्रजी व मराठी हस्ताक्षर इत्यादि दुर्मिळ गोष्टींचा संग्रह त्यांत केला आहे. त्याचप्रमाणे तत्कालीन नियतकालिकांतील उतारे देऊन बाळशास्त्री हे किती मोठ्या योग्यतेचे असाधारण विद्वान्, कर्तृत्ववान्, समाजसुधारक, पंडितमुकुटमणी, पुरातत्त्व संशोधक होते, याबद्दलचा समकालीनांचा निर्णयहि वाचकांस संपादकांनी सादर केला आहे. यांत झालेली पुनरुक्ति मात्र टाळणें शक्य व अवश्यहि होतें. त्यामुळे किंमत फारशी कमी झाली नसती, तरी पृष्ठसंख्या तरी निदान फार फुगली नसती.

एल्फिन्स्टन कॉलेजशीं संबंध आलेले अनेक विद्वान् महाराष्ट्रांत होऊन गेले. डेक्कन् कॉलेजांतील विद्वानांचीहि अशीच मोठी परंपरा आहे. या महान् विद्याव्यासंगी लोकाग्रणींविषयी आजपर्यंत उपलब्ध असलेल्या माहितींत प्रस्तुत ग्रंथानें मोलाची भर घातली असून तिचें संपूर्ण श्रेय लेखकाला देणें अगत्याचें आहे. प्रथम खंडाच्या तिसऱ्या विभागांतील टीका संयम, संक्षेप व सदभिरुचि या आवश्यक गुणांच्या अभावानें कांही ठिकाणीं ( कोणी ' पुष्कळ ठिकाणीं ' असेंहि म्हणेल ) दूषित झाली नसती, तर संपादकाच्या कार्याचें अधिकच कौतुक झालें असतें. महाराष्ट्रांतील रसिकांनी या दोषाकडे सहृदयतेनें दुर्लक्ष करून आचार्य बाळशास्त्री यांच्या स्मारकाचें कार्य करण्याचें मनावर घेऊन ग्रंथकाराच्या योग्य अशा ध्येयाच्या परिपूर्तीला साहाय्य करावें असें आम्हांस मनापासून वाटतें. म. अ. करंदीकर

अनुक्रमणिका

काळजी लेखकाने घेतली आहे. म्हणजे वाचकाचा गोंधळ व्हावा अशी त्या लेखनाची शैली व मांडणी आहे. विवेचनाचा मुख्य दोष असा आहे की त्यांत सामान्य विधानांस उदाहरणें दिलेलीं नाहीत. तसेंच निश्चित कालविभागांची आखणी वा उल्लेख कोठेहि नाही. आपल्या विधानांची व्याप्ति वाढावी म्हणून तीं फार स्थूलपणें केलीं आहेत. जगांतील निरनिराळ्या देशांतील संस्कृतींचा विकास एकाच प्रक्रियेने झाला आहे हें लेखक गृहीत धरतो. त्यांचा कालविभाग मात्र निरनिराळ्या देशांत निरनिराळा झाला हें मान्य करूनहि ते कालविभाग वेळोवेळीं निर्दिष्ट करण्याची काळजी लेखक घेत नाही. त्यामुळे विशिष्ट विधान कोणत्या देशांतील कोणत्या कालांतील साहित्याला लागू पडतें हें लक्षांत येणें कठिण जातें. त्यामुळे सर्व विवेचन नुसतें तरंगतें आहे असा परिणाम होतो.

साहित्याचें मूल्यधन (शब्दप्रयोग चमत्कारिक वाटतो.) अजमावतांना साहित्यास इष्ट वाटणाऱ्या प्रत्येक गोष्टीस मूल्याचें महत्त्व देण्याचा प्रयत्न लेखकाने केलेला दिसतो. वस्तुतः वास्तववाद हें मूल्य नसून अभिव्यक्तिपद्धतिविषयींचें एक मत आहे. त्यामागचें मूल्य पहावयाचें म्हटलें तर तें 'सत्य' असें म्हणावें लागेल. ध्येयवाद वा आदर्शवादाच्या पाठी-मागचें मूल्य शिव म्हणावें लागेल. विविध मूल्यांची जी माला लेखकाने उल्लेखिली आहे तीवरून मूल्य शब्दाचें मूल्य कमी झाल्यासारखें वाटतें. रस हेंहि मूल्यच, अलंकार हेंहि मूल्यच; स्वभावदर्शन हेंहि मूल्य आणि ध्वनि हेंहि मूल्य; परिणामैकता हें एक मूल्य, कलात्मकता हें एक मूल्य व पुरोगामित्व हेंहि मूल्य; खरोखर या सर्वांचा अंतर्भाव सत्य, शिव, सौंदर्य यांत करतां येण्यासारखा असतांना मूल्यधनचर्चेत त्यांचा कोठेहि उच्चार न करतां त्यांत अंतर्भूत होणाऱ्या उपांगांचाच उल्लेख लेखकाने केला आहे. शेवटीं ज्या मानवता मूल्याचा उल्लेख तो करीत आहे, तेंहि खरोखर या तिहींपैकी एकांत सामावण्याजोगें आहे. मूल्याचा विकास होत होत मानवता मूल्यापर्यंत लेखक येतो व शेवटीं म्हणतो एका अर्थाने आजपर्यंतच्या साहित्याने ह्याच मूल्याची जोपासना व उपासना केली नाही काय? (पृ. १४७) असें जर आहे तर तें नव्याने सापडल्यासारखी या पुस्तकांत जी ऐट आणली आहे ती फुकट नाही काय?

लेखकाचा कटाक्ष स्थितिशीलतेवर, चिरंतनतेवर, सनातनत्वावर आहे. त्यामुळे साहित्याचीं मूल्यें बदलत असल्याचा भास त्याला होतो, व किंचित् नावीन्य दिसलें की त्यास तो नवीन मूल्य म्हणूं लागतो. मानवता मूल्य हेंहि कांही काल टिकल्यावर त्यास नकोसें होईल व दुसऱ्या मूल्याचा शोध तो घेऊं लागेल असें दिसतें. नवीन संयोजन—संस्कृति म्हणजे काय याचें लेखकाने केलेलें विवेचन अत्यंत अपुरें व असमाधान-कारक आहे; किंबहुना या पुस्तकांतील अनेक विचार असे अपुरे व म्हणून असमाधानकारक वाटतात. कित्येक मुद्यांचा ऊहापोह केल्याचें लेखक बोलतो, पण अनेक वेळा त्यांच्या 'ऊहापोहां'तील उ प्रमाणे तो लघु होतो. असें वाटतें की लेखकाने अनेक गोष्टी वाचल्या आहेत, त्या सर्वांचा समावेश लहानशा जागेंत करावयाचा आहे; म्हणून तो कित्येक गोष्टी नुसत्या उल्लेखितो, व सोडून देतो. त्या सर्व गोष्टींचें एक रसायन होऊन तें बाहेर पडण्याऐवजी अर्धेकच्चें पकविलेलें तसेंच वाढण्यांत आलें आहे. लेखकाचीं मतेंहि कितपत रेखीव व निश्चित आहेत याबद्दल शंका वाटते. पुढील परिच्छेद या दृष्टीने पाहण्यासारखा आहे.

"साहित्यांत, कलात्मकता हवी हें कोणीहि मान्य करील, परंतु कलात्मकता म्हणजे काय हें प्रत्यक्ष कलावादीहि सांगूं शकणार नाही. (कलावंत कदाचित् सांगूं शकणार नाही,

पण कलावादी कां नाही ?) तो फार तर त्याच्या दृष्टीने श्रेष्ठ अशा कृति उदाहरणें म्हणून दाखवूं वा लिहूंहि शकेल. परंतु त्याच्या मताशीं सर्वथैव सहमत होणें हें कठीण आहे. (त्याच्याशीं सहमत की त्याच्या मताशीं सहमत ?) या असंदिग्धपणामुळे (अ नको आहे;) पण हा संदिग्धपणा तरी गृहीत कां म्हणून ?) कला हें मूल्य (कला कीं कलात्मकता ?) कितीहि आकर्षक आहे असें वरवर वाटलें, तरी तें तितकेसें स्वीकारणीय (स्वीकरणीय ?) वाटत नाही. (तितकेसें म्हणजे किती ?) कारण त्यांत कलात्मकतेच्या नांवाखाली तंत्र-शुद्धतेवरच भर दिलेला दिसून येतो. किंबहुना वर उल्लेखिल्याप्रमाणे एक प्रकारच्या विस्मृति-वादांतून कलावादाचा जन्म झाला असल्याने साहित्याचा जीवनाशीं संबंध तुटतो. (विस्मृति-वाद हा शब्द राहोच, पण त्या आशयाचें विवेचन या पानांत किंवा त्याच्या आधीच्या कित्येक पानांतून आलेलें नाही.) तें अधिक स्वप्नाळु वा दुबळें (वा पाहिजे कीं व ?) एकप्रकारें स्थितिशील होत जातें. साहित्याकडे अधिक आस्थेने पाहणाऱ्यांना अर्थातच, हें सहन होत नाही; व पुनः याहि विचारसरणीवर (म्हणजे कोणती ? तें या परिच्छेदांत विचार-सरणीच्या रूपांत आलेलें नाही.) आणखी प्रतिक्रिया (म्हणजे आधी दुसरी एखादी प्रति-क्रिया सांगितली असेल असें वाटण्याचा संभव आहे, पण तसें झालेलें नाही.) सुरू होते. विरोधी मताभिमान्यांकडून साहित्याचें मूल्य 'जीवन' हें असावें असें पुरस्कारण्यांत येतें. तत्पूर्वी आणखी एका मूल्याचा उल्लेख करणें प्राप्त आहे. तें म्हणजे मनोविश्लेषण हें होय. (कला व जीवन या दोहोंमध्ये हें कशाला ? त्यामुळे वाचकाचा गोंधळ होत नाही काय ?)"

हा उतारा इतका सविस्तर देण्याचें कारण एवढेंच की एकंदर विवेचनांतील अपुरेपणा व त्यांतील रेखीवपणाचा अभाव लक्षांत यावा. विवेचनांत अनेक वेळा तर्कशुद्धतेचाहि अभाव असतो. एक बारीकसें उदाहरण येथे देतों. "हिलाच आपण 'कृषि–संस्कृति' म्हणूं या; कारण उपर्युक्त तत्पूर्व संस्कृतींपासून ती पूर्णपणें भिन्न होती, भव्य होती." (पृ. ५) या संस्कृतीला 'कृषि–संस्कृति' नांव द्यावयाचें तर तिचा कृषीशीं संबंध आहे म्हणूनच देतां येईल. ती इतर संस्कृतींहून भिन्न किंवा भव्य होती हें कारण कसें होऊं शकेल ?

पुढील कांही विधानें लेखकाने ठिकठिकाणीं केलेल्या अनेक शंकास्पद विधानांची प्रातिनिधिक आहेत. "नाट्य हा पहिला साहित्याविष्कार" असें एका परिच्छेदाचें शीर्षक आहे. मग ऋग्वेदास नाट्य म्हणण्याचा प्रसंग यावयाचा. काव्यविचारापूर्वी नाट्यविचार सुरू झाला हें खरें मानलें, तरी काव्याआधी नाट्य होतें हें कसें खरें मानावयाचें ? दुसरें विधानः— "मुद्रणानंतर खरें गद्य जन्मास आलें". दण्डी, बाण व सुबन्धु यांचें गद्य मुद्रणोत्तर काय ? का तें खरें गद्य नव्हे ? पुढील विधान 'त्याचा आणि तत्पूर्व साहित्य जें काव्य ह्यांचा संघर्ष सुरू झाला'. दण्डीच्या कालीं गद्य, पद्य व मिश्र सुखेनैव नांदत असें त्याचें मत दिसतें. तिसरें विधान—"कारण घाईचें जीवन, मुद्रणसुलभता, सामान्य व्यक्तिभावनांना महत्त्व व यांत्रिक प्रगति या सर्वांचा साहित्यांत असा परिणाम झाला की भावगीत, लघुकथा, लघुनिबंध, नाट्य-छटा, इ. लघुताप्रधान वाङ्मयप्रकार रूढ झाले." सामान्य हें विशेषण व्यक्तींचें कीं भावनांचें हें स्पष्ट नाही; पण तें बाजूस ठेवूनहि असें म्हणतां येईल की भावगीताचें अस्तित्व घाईचें जीवन, मुद्रणसुलभता, यांत्रिक प्रगति यांच्या आधीपासून नाही काय ? तसेंच नाट्यछटेचा जन्म या कारणांनी झाला, हें म्हणणें खरें आहे काय ? लघुनिबंध प्रथम मॉंटेनने व नंतर बेकनने तीन-चारशें वर्षांपूर्वीच लिहिला नाही काय ? त्या वेळीं कोणती घाई व यांत्रिक प्रगति झाली होती. मुद्रणकलेचा परिणाम लेखन दीर्घ होण्यास अनुकूल व्हावा की प्रतिकूल ? मुद्रण नव्हतें

व पाठ करावें लागे म्हणून ना 'सूत्र' शैली अस्तित्वांत आली? मग त्यामुळे साहित्यप्रकार लघु होण्याचें कारण काय? साहित्यप्रकाराच्या विकासांत कांहीं साहित्यकलाविषयक कारणें महत्त्वाचीं असतात हें विसरून सामाजिक घटनांना भलतेंच महत्त्व देण्यांत काय अर्थ आहे? वादग्रस्त होऊं शकणारीं अशीं अनेक विधानें या विवेचनांत भरलीं आहेत. त्यांचें येथे फक्त दिग्दर्शन केलें. सारांश असा की आरंभीं लेखकाचा आशय म्हणून जो सांगितला, तो एकवेळ कोणाला मान्य झाला, तरी त्याचें प्रतिपादन अशा सैलपणें व अपरिपक्वपणें झालें आहे की एकंदर परिणाम तो आशय धूसर व शंकास्पद असल्याचा व्हावा. प्रस्तुत ग्रंथाचे लेखक प्रा. दु. का. संत यांनी ज्या प्रयत्नास हात घातला, तो स्तुत्य व अभिनंदनीय यांत शंका नाही. परंतु त्या प्रयत्नास खरें यश मिळालें नाही असें न म्हटल्यास अप्रिय गोष्ट म्हणण्याची टाळाटाळ केली असें होईल, म्हणूनच इतका विस्तार केला. ग्रंथाच्या पुढील आवृत्तींत त्यांनी याबाबत काळजी घ्यावी व सविस्तर उदाहरणें देऊन उपपादन करावें, म्हणजे त्यांच्या श्रमाचें व अभ्यासाचें चीज होईल.

रा. श्री. जोग

इतिहासांतील सहली, ले. यशवंत नरसिंह केळकर, पृ. सं. ३४५; किं. ४ रु. पत्ता. पुष्करिणी, डेक्कन जिमखाना पुणें ४.

या पुस्तकांत श्री. यशवंतराव केळकर यांनी इ. स. १९३३ ते १९४७ या चौदा वर्षांत सह्याद्रि, पराग, केसरी, महाराष्ट्र अशा निरनिराळ्या नियतकालिकांतून निरनिराळ्या प्रसंगीं लिहिलेल्या तेवीस ऐतिहासिक लेखांचा संग्रह केला आहे. या फुटकळ लेखांचें ग्रंथरूपाने पुनर्मुद्रण श्री. केळकर यांनी प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणे अभ्यासकांस निःसंशय उपयुक्त ठरणार आहे. उदाहरणार्थ, लेखकाने नागपूरकर भोसल्यांच्या बखरींतील अपपाठांचें शुद्धीकरण दहा वर्षांपूर्वी नागपूरच्या महाराष्ट्रांत प्रसिद्ध केलें होतें. तें आता पुनश्च प्रसिद्ध झाल्याने अभ्यासकांची सोय झाली आहे. हे शुद्धीकृत पाठ काळजीपूर्वक वाचणारास ती बखर दुरुस्त करून घेण्याची संधि तर मिळेलच, पण त्याहीपेक्षा मोडी लेखनांतील विशिष्ट लपेटीच्या वळणामुळे चुका कशा होऊं शकतात तें कळतें व इतरत्रहि तसे कागद वाचतांना तशा स्वरूपाच्या चुका अभ्यासकास टाळतां येतील. या लेखसंग्रहांतील जंजिरा मोहिम या सहा लेखांकांच्या विषयाने पुस्तकाचीं उणींपुरीं ९० पृष्ठें व्यापिलीं आहेत. हें विवेचन लेखकाच्या सूक्ष्म व्यासंगाची व केलेला व्यासंग ओघवती भाषेंत मांडण्याच्या सामर्थ्याची साक्ष पटविणारें आहे. श्री. यशवंतराव हे संशोधक असून साहित्यिक आहेत हें त्यांनी आपल्या ऐतिहासिक पोवाड्यांच्या सूक्ष्म संपादनाने व वसईच्या मोहिमेच्या बहारदार कथनाने सिद्ध केलेंच आहे. त्याचाच पुरावा या लेखांतूनहि मिळतो. परंतु लेखकाच्या अंगच्या गुणांबरोबरच मला अशा लेखांतून मराठी रियासतीच्या अंतरंगावर जो प्रकाश पडतो तिकडे वाचकांचें विशेष लक्ष वेधणें अवश्य वाटतें. श्री. केळकर यांची उपरोक्त जंजिरा मोहीम मराठेशाहीच्या ऐन भरभराटीच्या काळावर महत्त्वाचा प्रकाश पाडते. मराठे सरदारांची परस्परांतील स्पर्धा, शाहूचें दुबळेपण व प्रसंगाचें महत्त्व ओळखण्याची अपात्रता हीं सर्व या हकीकतींतून चांगलींच प्रत्ययास येतात. 'पुरंदरच्या तहाची पडद्यामागील हकीकत' या ४० पृष्ठांच्या लेखांत लेखकाने कॅप्टन् मॅक्फर्सन याने या प्रसंगीं लिहिलेल्या रोजनिशीचा विस्तृत गोषवारा तारखेवार दिलेला आहे. त्यावरून पेशवाईंतील मुत्सद्दी घरच्या दुहीच्या ऐन संकटांत सापडले असतांना देखील किती निग्रहाने मुद्यावर बोट ठेवून इंग्रज प्रतिनिधींशीं बोलणी करीत तें चांगलें लक्षांत येतें. यशवंतराव हे इतिहासक्षेत्रांतील

एकांडे शिलेदार नव्हत, चौफेर विहार करणारे आहेत. कधी जुन्या उपलब्ध इंग्रजी डायरीचा मराठी तर्जुमा देऊन, तर कधी झाशीवाली लक्ष्मीबाईच्या मुलाचें आत्मचरित्र हुडकून, तर कधी ठिकठिकाणचीं साधनें अभ्यासून संगतवार हकीकत तयार करून, तर कधी एखाद्या ऐतिहासिक साधनांतील शब्दाशब्दाची फोड करून, तर कधी जुन्या मराठी वर्तमानपत्रांतील निवडक वेचे देऊन तर कधी ऐतिहासिक स्थळांभोवती आपण केलेल्या प्रवासाचें इतिहासाभ्यासास उपकारक होणारें वर्णन देऊन श्री. केळकरांनी इतिहासकाराच्या अंगीं कोणते गुण असावे याचें जणू प्रात्यक्षिकच वाचकांपुढे ठेवलें आहे.

प्रसिद्ध झालेले लेख इ. स. १९३३—४७ या काळांतील असले तरी ते लेखनाच्या कालक्रमाने किंवा इतिहास–प्रसंगांच्या कालक्रमाप्रमाणे लावलेले नाहीत. किंवा इतर कोणताहि क्रम त्यांत नाही. शेवटचा 'म्हैसूरकडील प्रेक्षणीय स्थळांचें दर्शन' हा लेख इतिहासांतील सफरीपेक्षा प्रवासवृत्तांत अधिक शोभणारा आहे. पहिला 'गजगौरव' हा श्री. नानासाहेब चापेकर यांनी यथार्थरीत्या प्रशंसिलेला लेख हत्तीबद्दल निःसंशय उपयुक्त अशी माहिती — ऐतिहासिक व इतर–देतो. पण हें सर्व प्रकरण इतिहासांत जमा करणें कठीण वाटतें. मराठी इतिहासाच्या अभ्यासकांनी इतिहासाच्या क्षेत्रमर्यादा या विषयासंबंधीच्या आपल्या कल्पना निश्चित करणें जरूर आहे. एवढा विचार या प्रसंगीं नमूद करणें जरूर वाटतें.

रा. वि. ओतुरकर

घर— ले. वसंत कानेटकर.

घर हा दोन अक्षरी शब्द आहे. परंतु हीं अक्षरें असलेले आणखीहि बरेच शब्द आहेत. 'घर' या दोन अक्षरांच्या उच्चारावरोबर घरघर–घरदार–घार–धार–मार–असे अनेक शब्दहि गंमत म्हणून आठवणें शक्य आहे. यांतील कांही शब्दांमुळे कांही अनुभवलेले प्रसंगहि आठवतील. परतु या सर्व प्रकारांत कांही संगति असूं शकेल की नाही? 'घर' या अक्षरावरून सुरू झालेली घर–घर–कोठें तरी थांबेल की नाही? घरावरून नेहमीच घरदार–घार–मार–घरघर असें आठवत असणें कितपत स्वाभाविक आहे? असे अनेक प्रश्न या 'तंत्रशरण' पुस्तकावरून मनांत येतात. माणसाच्या जागृत किंवा प्रकट मनांत एक विचारप्रवाह असतो. त्याच वेळीं अंतर्मनांत कांही निराळीच गडबड चालू असते. अंदरकी ही बात शास्त्रास थोडी ऐकूं येऊं लागल्यापासून अंतर्मनाचें एक शास्त्र होऊं पहात आहे. या नव्या ज्ञानाचें सध्या इतकें वेड माजलेलें दिसतें की, प्रकट मनापेक्षा, ज्ञानापेक्षा, अज्ञाताविषयीच विलक्षण आकर्षण माजलें आहे. त्यामुळे माणसाच्या आचारविचारासंबंधीच्या सुसंगतीचे, स्वाभाविकतेचे, युगानुयुगें चालत आलेले संकेत डळमळूं लागल्याचें अनेकजण मोठ्या आवेशाने सांगूं लागले आहेत !

या आवेशाचें प्रस्तुत कादंबरी हें एक ताजें उदाहरण आहे. मुंबईच्या यांत्रिक जगांत बकाली वातावरणांत पोटासाठी अडकलेला रघुनाथ नांवाचा एक सीधा घरंदाज माणूस दूर कोकणांत राहिलेल्या घरीं जाण्यासाठी तळमळत आहे. त्याला अशी ओढ निर्माण करण्याइतकें अभिजात घर त्याला सुदैवाने लाभलें आहे. परंतु नोकरीपायीं त्याला वर्षानुवर्षे रजाच मिळत नाही आणि एकदा मोठ्या मेहरबानगीने रजा मिळाली तर ऐनवेळीं गाडी चुकली ! घरीं जाण्याचा सुखाचा घास ऐनवेळीं एका यंत्राने तोंडाजवळून खाली पाडल्याने त्याच्या

मनाचा चरफडाट होतो. त्या उद्विग्न मनःस्थितींत तो कुठें तरी मन रमविण्याचा मार्ग नि जागा शोधीत असतां त्याला बाटलीवाला या एका परिचिताची आठवण झाली आणि मारी या तरुणीने पूर्वी केलेला लाघवीपणा, तिच्या उन्मादक तारुण्याच्या सहवासाचा पूर्वी लुटलेला आनंद आठवला. तो तडक मारीकडे निघाला ! पण दुर्दैवाने ती दुसऱ्याच एकाच्या बाहुपाशांत मग्न झाल्याचें दृश्य पाहून रघुनाथ अतिशय संतापतो. त्या संतापाच्या भरांत तो कोणत्या तरी स्त्रीच्या सहवासाच्या धुंदीसाठी जास्तच अधीर होतो. 'मारी नाही तर आणखी कोणीतरी–' इतक्या बेफामपणें तो रस्त्याने जातां जातां एका तरुणीस एका आडदांडाच्या हातून त्याने सोडविलें. त्या तरुणीकडून उपकाराची फेड म्हणून तरी...पण तेथेहि त्यास धक्काच बसला ! ट्रॅम--मध्ये तो बसला तेथे केवळ योगायोगाने त्यालाच एका वेश्येने गांठलें ! त्याच्या शरीराची भूक फारच भडकली. तो त्या वेश्येच्या मागे तीन जिने चढून एका 'माडी'वर पोहोचला. एका सुकुमार स्त्रीचा देह त्याला 'भाड्याने' मिळाला. कांही क्षण तरी त्या स्त्रीदेहाचा तो मालक ठरला. त्याने तिने तिला घट्ट आलिंगनहि दिलें. परंतु त्याच्या दुर्दैवाने त्या स्त्रीवर नुकताच भीषण अत्याचार झाल्याने तिच्याकडून कोणतीहि उत्तेजक हालचाल झाली नाही ! ती मरणोन्मुख होऊन पडली होती. अशा स्थितींतील स्त्रीदेहाच्या स्पर्शाने रघुनाथ एकदम दचकला आणि कामोपभोगाने संत्रस्त मन शांत करण्याची त्याची प्रचंड तळमळ एकदम थंडावली. घराविषयीच्या तत्त्वज्ञानाच्या प्रभावाने तो या प्रसंगांतून वाचला नाही तर केवळ 'योगायोगाने वाचला. त्या वेश्येने ' Response ' दिला असता तर ?

रघुनाथ तडक घराकडे निघाला. परंतु लोकलमध्ये लोंबकळून जात असतां त्याला घेरी येऊं लागली. एका म्हाताऱ्याने त्याला आंत खेचलें. रघुनाथ वाचला आणि ' घर ' या ग्रंथांतील घरघर थांबली ! " सुटलों बाबा " असा सुस्कारा सोडीत वाचक हें पुस्तक खाली ठेवतो.

वस्तुत: वर ज्या पद्धतीने कथानक सांगितलें आहे, त्याच सुबोध बाळबोध पद्धतीने तें सांगितलें असतें तर वाचकास सुस्कारा टाकण्याचा प्रसंग आला नसता. आधुनिकतेचा कळस झालेल्या शहरांतील वातावरणांत जिवंत माणसांना ज्या यातना ( विशेषत: जी मानसिक कुचंबणा ) भोगाव्या लागतात त्यांच्या रेखाने हें एक अत्यंत हृदयस्पर्शी कथानक झालें असतें. परंतु ही अतिशय भावसंपन्न घटना एका नव्या तंत्राच्या (Psycho-analytical methodच्या) वेडापायीं ठार झाली आहे. या विचित्र तंत्राचा एक नमुना दाखविण्यासाठीं लेखकानें एक सुंदर कथा दिली आहे ! ' पार्श्वभूमि ' सदरांत दिलेली पहिलीं १० पानें ( पृ. १४ ते २४ ) हें घर या आर्यसंस्थेचें संस्कारसंपन्न भावघन असें हृदयस्पर्शी चित्र आहे. परंतु जें उत्तम, अभिजात तें पार्श्वभूमींत गाडून लेखकाने ' रघुनाथ ' या नांवाच्या सदराचें १४४ पृष्ठांचें एक बेढब ' झोपडें ' त्यावर रचलें आहे. रघुनाथाच्या मनास घराविषयी अतिशय उत्कट प्रेम आहे, परंतु परिस्थितीमुळे त्या प्रेमाची भूक अतृप्त राहिल्याने त्याचें मन भडकतें आणि बहकतें. हें सगळें सुसंगत नि स्वाभाविक असेलहि, परंतु त्याच्या भ्रमंतीचे दुवे मोठे विलक्षण आहेत. तोच म्हणे संज्ञा-प्रवाह ! कांही नमुने पहा. वृत्तपत्रांत तो नोकर आहे. आपल्या नोकरीच्या भावी वैभवाचीं स्वप्नें रंगवीत असतां...आपल्याला छोटीशी जागाहि मिळाल्याचें मनोराज्य तो रंगवितो. परंतु त्या मनोराज्याचा शेवट कसा व्हावा ? छोटीशी जागा या अक्षरांवरून उद्याच्या अंकांत छोटीशीहि जागा नाही हे शब्द आठवल्याने, तसेंच वृत्तपत्रांतील एका बातमींतील शब्दांच्या अक्षरांच्या धाग्याने ( पंतप्रधानांचें कोकणांत बादशाही स्वागत ) रघुनाथचें विमान कोठल्याकोठे भडकलें ! ( पृ. ४९ ) स्टार्लिंग प्रश्नावरून डार्लिंग प्रश्न आणि डार्लिंग मारीचें

बेहोष मुख इत्यादि ( पृ. ५१ ) छापखान्याच्या यंत्रांत घूस, तिचे चिरडलेले डोळे. चिरड-लेल्या या अक्षरांवरून संज्ञाप्रवाह फुटला तो; रडलेले डोळे—आणि इंदुमती रडली तिचे डोळे किती मोहक ( पृ. ५३ ) मारी आपलीच. आपलीच अक्षरावरून—आपलीच इंदु-मती आठवली ( पृ. ९२ ) दोन मनांतील प्रवाहांना जोडणारे दुवे हे असे आहेत ! सर्व-सामान्य माणसाच्या मनांत नुसत्या वर्णोच्चारसाम्यावरून जर अंतर्मनांतले प्रवाह असे येतां जातां इतके उफाळून त्याच्या जाणीवेस गुदमरवूं लागले, तर तो भ्रमिष्टच होईल. रघुनाथच्या मनांतले संज्ञाप्रवाह हे तर त्याच्या भ्रमिष्ट मनःस्थितीचेच पुरावे दिसतात. संज्ञाप्रवाह संपतांना लेखकाने मधून मधून म्हटलेंहि आहे. ' समाधींतून जागा होऊन ' ( पृ. ८६ ) रघुनाथ चालला होतां, झोपेंत चालणारा माणूस चालतो त्याप्रमाणे ( पृ. १०९ ) इत्यादि.

कांही विशिष्ट प्रसंगीं माणसाच्या मनांत कोलाहल माजतो. क्षुद्र प्रत्यक्षावरून भूतकालीन उत्कट प्रसंग डोळ्यांसमोर उभे राहतात. परंतु स्मृतीचा प्रवाह धरणाचा बंधारा फुटावा तसा फुटणें हें विकृतीचें लक्षण मानावें लागेल. एका दिवसांत २४ तासांत रघुनाथचें मन इतकें बहकत गेलें म्हणे ! बहकेलहि, पण त्यांतहि कांही संगति असणेंच स्वाभाविक आहे. स्टार्लिंग-वरून डार्लिंगकडे धाव घेणें असला वेग फारच चिंताजनक आहे ! या मार्गाने रघुनाथ वेड्यांच्या इस्पितळांत जाणें सुसंगत ठरलें असतें.

प्रा. गोकाक यांनी प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे की, वसंतरावांनी ' घर ' या संस्थेचें तत्त्वज्ञान ( The Philosophy of Home ) येथे स्पष्ट केलें आहे. परंतु तें ' पार्श्वभूमि ' या प्रकरणांत काय तें धडपणें आढळतें. मुंबईसारख्या यांत्रिक संस्कृतीने पछाडलेल्या शहरीं माणसें किती भकास आणि भेसूर जीवन घालवीत आहेत याची जाणीव होणें हा कथेचा अपेक्षित परिणाम होय. रघुनाथचें जीवन घर दूर राहिल्याने असें उध्वस्त होत असेल, पण मुंबईतच ज्यांचीं घरें आहेत त्यांचींहि मनें या तथाकथित भौतिक संस्कृतीने मृतप्राय झालीं आहेत. यंत्रयुगांत आपापल्या घरांतहि माणसें निर्वासित झालीं आहेत. परंतु घराचें तें सूक्ष्म दर्शन येथे होत नाही. एका नव्या अप्रगल्भ शास्त्राच्या आणि तंत्राच्या नावीन्याच्या वेडामुळे लेखकाने आपलें कल्पनावैभव ' व्यर्थ ' घालविलें आहे असें मोठ्या दुःखाने म्हणावें लागतें. पण एक गोष्ट मात्र या सर्व अनैसर्गिक खटाटोपांतूनहि स्पष्ट दिसते. उजेडांतील आकृति रंगवायचें सोडून मुद्दाम अंधारांतील आकाराचे आलेख काढण्याच्या चालू फॅशनला लेखक बळी पडला नसता, तर त्याच्याजवळ अवलोकन, रचना आणि शैली यांचें साहित्य चांगल्या प्रकारचें आहे. दोष आहे तो त्याने निवडलेल्या अस्वाभाविक आणि पुस्तकी तंत्राचा आहे. हें मुद्दाम सांगण्याचें कारण एवढेंच की नव्या तंत्राची भलावण करणें ही ज्यांनी आपली जणू ' पक्षनिष्ठा 'च बनवून टाकली आहे अशा लोकांकडून प्रो. वसंत कानेटकरांसारख्या तरुण लेखकाची दिशाभूल केली जाण्याचाहि संभव आहे. " त्यांना हें तंत्र अद्याप पुरतें साधलें नाही; " असेंहि सूचित केलें जाण्याचा संभव आहे. या तंत्रांतील पहिली कादंबरी तंत्रशुद्ध आणि रेखीव आहे. पण मुख्य प्रश्न असा आहे—जें व्यक्त करायचें त्याला या द्राविडी प्राणा-यामाचा उपयोग होतो कीं अडथळा होतो ? कांही तरी नवीन करून प्रसिद्धि मिळविल्या-शिवाय इलाज नाही अशी गत होण्याइतकें बुद्धीचें अगर रसिकतेचें दुर्भिक्ष्य या लेखकाजवळ नाही हें त्याच्या इतर लेखनावरून वाचकांनाहि माहित आहे. अशा स्थितींत त्याने ही विचित्र कथनपद्धति पत्करण्यांत चूक केली आहे, असें टीकाकाराहूनहि सर्वसाधारण वाचकांना वाटल्यावाचून राहणार नाही.

श्री. के. क्षीरसागर

अर्धवर्तुळें :—लेखक–श्री. प्रभाकर पाध्ये; प्रकाशक दा. ना. मोघे, कोल्हापूर. किंमत अडीच रुपये.

"अलीकडे चांगल्या दर्जाचें ललितवाङ्मय वाचायला मिळत नाही, कादंबऱ्यांचे तेच तेच ठराविक प्रेमाचे विषय अन् खरीखोटी राजकीय पार्श्वभूमि; अन् कथांना तर तो अन् ती शिवाय विषय नाही. अलीकडे "नव-कथा" म्हणून जो काय वाङ्मयप्रकार निघाला आहे त्याचा अर्थ त्या लेखकांनाच ठाऊक!" अशीच पुष्कळशी टीका किंवा कुरकूर वाचकांकडून ऐकायला मिळते.

श्री. पाध्ये यांचा "अर्धवर्तुळें" हा कथासंग्रह वरील आक्षेपांना प्रत्युत्तर द्यायला समर्थ आहे. लेखकाजवळ भावनोत्कटता, सहृदयता व आपल्या लेखनाचे विषय व व्यक्ति यांसंबंधी मनापासून तळमळ असेल, तर त्याच्या हातून रसाळ ललित वाङ्मय खचित निर्माण झाल्यावाचून राहणार नाही.

या कथासंग्रहांत दीर्घ व लघु अशा नऊ कथांचा समावेश झालेला आहे. कथांच्या विषयांत फारसें नावीन्य आहे असें नाही. मातेचें अपत्याविषयीचें प्रेम, बंधुप्रेम, घरांतील मुक्या जनावरांविषयी वाटणारी आस्था, अशा प्रकारचे परिचयाचे व व्यापक भावनांवर अधिष्ठित असेच विषय यांतहि आहेत. तथापि त्या वाचाव्याशा वाटतात याचें प्रमुख कारण म्हणजे त्यांतील व्यक्तींशीं लेखक मनापासून एकरूप होतो. पात्रांच्या रागालोभाचे, प्रेममत्सराचे किंवा सूक्ष्म मानसिक गुंतागुंतीचे प्रसंग ज्या वेळीं लेखक रेखाटतो, त्या वेळीं पात्रांच्या मानसिक प्रक्रियांचें पृथक्करण करण्याचा लेखक प्रयत्न करितो. अन् अनेकदा पात्रांच्या स्वभावाची लेखकाने केलेली कारणमीमांसा पटतेहि.

"वेडी आशा" ही या संग्रहांतील दीर्घकथा पहा. श्रीधरपंत व रमाकाकू यांची एकुलतीएक कन्या निवर्तल्यानंतर आपल्या जांवयाचा व नातवाचा तीं दोघें अपत्यवत् प्रेमाने संभाळ करितात. जावईबुवा कालांतराने द्वितीय विवाह करितात. नव्या संसारांत गढून जातात. दैनंदिन व्यवहारांत हरघडी दृष्टीला पडणारी ही गोष्ट! त्यांतील सार्‍याच पात्रांचें विशेषत: रमाकाकूंचें मनोविश्लेषण लेखकाने कौशल्याने केलें आहे. जांवयाने दुसरें लग्न केल्याने धुसफुसलेल्या, चिडलेल्या, दुखावलेल्या रमाकाकू व समंजस, व्यवहारी, बुद्धिवादी श्रीधरपंत, दोघांचीहि आशा करपून गेली आहे; पण त्या व्यक्तिचित्रांतील विरोध लक्षणीय आहे. कथेची अखेरी कारुण्यपूर्ण पण कलात्मक आहे.

"अज्ञात बळी," "बीजेची चंद्रकोर," "तुळशीचा वाडा" इत्यादि कथा वाचतांना एक गोष्ट जाणवते ती अशी की जीवनांतील दु:खेंच लेखकाला तीव्रतेने जाणवतात. जीवनांतील आनंद, आशावाद, सौख्याच्या घटना त्याला कथावस्तु म्हणून फारशा प्रिय नसाव्या.

"स्मशान आणि घर," "स्त्रीचें हृदय" व "आगगाडीचे रूळ" या तीनहि कथा वाचतांना नवकथांची आठवण झाल्यावाचून रहात नाही. स्मशानांतून परततांना विषादाने, अन् जीवनाच्या क्षणभंगुरतेबद्दल उबग, आणि जीवनाबद्दल भक्ति-आसक्ति यांमधील ओढाताणीने मन कसें बावरून गेलें आहे त्याचें चित्रण आहे. वर्णनपद्धति व विचारांची मांडणी नवकथेचा भास निर्माण करते. "आगगाडीचे रूळ" या कथेबद्दल मात्र वाचकांचा मतभेद होण्याचा संभव आहे. स्त्री-पुरुष प्रेमाच्या अल्पपरिचित व अपवादभूत प्रेमाच्या भावनेचें चित्रण यांत आहे. स्वतःच्या धाकट्या दिरावर पतिनिधनानंतर त्याच भावनेने प्रेम करणारी व त्याच्या जीवितांतील सुखदु:खांतच आपलें सुखदु:ख मानून राहणारी विधवा वहिनी ही यांतील

महत्त्वाची व्यक्ति होय. दिराच्या विवाहानंतर तो आपल्याला अंतरेल, आपलें जीवन भकास, उदास व एकाकी होईल या जाणीवेने ती मनांतल्या मनांत जळते, पण तिला पुढे कळून येतें की आपल्या दोघांचे जीवनप्रवाह, त्यांचीं उद्दिष्टे हीं सर्वथा भिन्न व स्वतंत्र आहेत. दोन समांतर रेषा कधीच मिळत नाहीत या भूमितींतील सिद्धांताची प्रचीति तिला येते व घराचा त्याग करून ती जाते. आगगाडीच्या रुळांशीं तिचें असलेलें भावनात्मक साहचर्य पाहतां लेखकाने गोष्टीचें नांव मार्मिक दिलें आहे यांत शंका नाही. वहिनीच्या मनांतील अप्रकट भावनांचें द्वंद्व यांत स्पष्ट आहे, तथापि आजच्या नवकथांतील अर्थशून्यता, विचारांचा संभ्रम व विसंगति यांत नाही. केवळ शारीर व लैंगिक संबंधांचीं अवास्तव, भडक चित्रेंहि सुदैवाने यांत नाहीत.

"स्त्रीचें हृदय" या कथेंत स्त्रीचें मातृत्व कधीच अपवित्र असूं शकत नाही, आणि म्हणूनच नीतीच्या सांकेतिक कल्पना बाजूला ठेवून प्रसंगीं स्त्रीच्या मातृत्वाची थोरवी मानायला हवी असा आशय लेखकाने सांगितला असला तरी ही कथा तंत्रदृष्ट्या सदोष वाटते. निशिकांत व सुहासिनी यांच्या प्रीतीचा विकास कृत्रिम रीतीने झाला आहे. त्या प्रीतींत संयम, संथपणा यांपेक्षा अतिरिक्तता व भडकपणाच आहे.

एकंदरींत कथासंग्रह आटोपशीर व आकर्षक आहे. निवेदनशैली रसाळ व ओघवती असल्याने हा संग्रह लेखकाच्या कीर्तींत भर टाकल्यावाचून राहणार नाही.

**गांवाकडच्या गोष्टी**—लेखक व्यंकटेश माडगूळकर. प्रकाशक—वा. पु. भागवत; मौजप्रकाशन लिमिटेड, खटाववाडी, मुंबई ४; किंमत तीन रुपये बारा आणे.

माडगूळकर बंधु व ग्रामीण जीवनावरील चित्रपट किंवा कथालेखन — सरस अन् सुंदर — हें आजच्या वाङ्मय क्षेत्रांतील लोकमान्य समीकरण होऊन बसलें आहे.

वाङ्मयांत समाजजीवनाचें प्रतिबिंब पडलेलें असतें अन् म्हणूनच त्याला समाजजीवनाचा आदर्श म्हणतात. पण हा आदर्श निष्कलंक तेव्हाच ठरतो की जेव्हा लेखकाने समाजाचें जें चित्रण केलेलें असतें तें चित्रण हृदयस्पर्शी, यथार्थ व वास्तव असें ठरतें.

श्री. व्यंकटेश माडगूळकरांनी ज्या ग्रामीण जीवनाचें अस्सल व जातिवंत चित्र आपल्या जातिवंत प्रतिभेने काढलें आहे, तें ग्रामीण जीवन त्यांच्या सर्वस्वी परिचयाचें आहे. नव्हे, त्याच वातावरणांत ते वाढले आहेत. तेथली परिस्थिति, तेथलीं सुखदुःखें, हर्षविषादाचे प्रसंग, सारे त्यांनी स्वतः अनुभविलेले आहेत. अन् म्हणूनच त्या (कथांची नव्हे!) गोष्टींची गोडी अवीट आहे. खेड्यावर सहलीला गेलों म्हणजे, आपण तेथल्या गाभुळलेल्या चिंचा, रसाळ टपोरीं जांभळें कितीहि खाल्लीं तरी त्यांचा कंटाळा येत नाही, तसेंच या गांवाकडच्या गोष्टींचें आहे.

माडगूळकर जणू आपल्या गांवीं वाचकांना घेऊन गेले आहेत अन् दुपारच्या न्याहारीच्या वेळीं किंवा चांदण्याच्या एखाद्या रात्रीं सारे वाचक त्यांच्याभोंवती बसून गोष्टी ऐकताहेत असें वाटावें इतकी स्वाभाविक व सुंदर अशी त्यांची निवेदनपद्धति आहे. "गोष्टी" म्हटल्याने त्यांत चटकदारपणा आहे, तसाच गोष्टीवेल्हाळपणाहि आहे; आणि अस्सल ग्रामीण बोलीभाषेने तर त्यांत चांगलीच चमक अन् रंग भरला आहे. माडगूळकरांच्या गोष्टींतले 'हसन मोमीन,' 'बापू न्हावी', आक्रस्ताळा, संतापी कर्दनकाळ 'बाबू कुळकर्णी' पापभीरु 'नेवरा' कीर्तीसाठी उत्सुक असलेला 'सोन्या,' गांवचे पाटील, तलाठी, कुळकर्णी, गुरव, सारे ग्रामबंधु आपल्या चांगल्या ओळखीचे वाटावे एवढी

त्यांचीं व्यक्तिचित्रें रेखीव अन् मनोज्ञ आहेत. त्या सान्यांच्याबद्दल एकप्रकारची आपुलकी व घरोवा मनांत निर्माण होतो.

साप्ताहिक मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या या गोष्टी—गोष्टी या नांवापेक्षा 'स्वभाव-चित्रें' म्हणून अधिक परिणामकारक वाटतात. कारण घटना किंवा कथाभाग थोडा असून वाचकांचें लक्ष त्यांतील विशिष्ट व्यक्तींवरच विशेष गुंदून रहातें.

खेडेगांवांतील हेवेदावे–बहुतेक वेळा क्षुल्लक कारणाने उद्‌भवलेले, जमिनीसाठी भांडणें कर्जासाठी सावकाराची लाचारी, जत्रा, महोत्सव इ. सर्व प्रसंगाचें चित्रण या गोष्टींतून झालें आहे. 'मारुतराय' 'गुप्तधन' 'करणी,' 'भुताचा पदर' इ० गोष्टींतून खेडेगांवच्या लोकांची अंधश्रद्धा, धार्मिक व भोळ्याभाबड्या समजुती यांचा लेखकाने खुबीदार रीतीने परामर्श घेतला आहे. 'झोंबी' सारख्या गोष्टींत शारीरिक तेढीचें पर्यवसान जातीय वैमनस्यांत कसें झालें याचें चित्रण आहे, तर 'कुत्री' 'काय सुदिक गेल न्हाई' इ० कथा अत्यंत हृदयस्पर्शी वठल्या आहेत.

व्यक्तिचित्रणांतील पृथगात्मता लक्षणीय आहे. वाक्यें लहानलहान, अर्थपूर्ण व सुटसुटीत असल्याने संवाद खुसखुशीत लागतात. कसल्याहि "तंत्रा"च्या कृत्रिम चौकटींत न बसविल्याने त्या गोष्टी आपल्या नैसर्गिक सौंदर्यानेच उठावदार दिसतात.

(१) "ती म्हातारी भाल्यासारखी उंच आहे पण म्हातारपणामुळे विळ्यासारखी वांकली आहे."

(२) "तो स्वभावानं मवाळ होता, वाळल्या पाचोळ्यावर पाय न देणारा," या 'नेवन्या'च्या वर्णनांत खऱ्या मराठमोळ्या लेखणीचें दर्शन घडतें.

"तो गांवांत टेशींत फिरे" किंवा "त्याचे खांदे गाडीच्या जुवासारखे रुंद होते" किंवा "थंडी अंगाचे चावे घेत होती, गांव गपगार होतें" या वर्णनांत अर्थ कसा ठासून भरला आहे!

श्री. माडगूळकरांच्या आणखी खूप गोष्टी ऐकायला वाचक उत्सुक असले तर काय नवल!

मा. किर्लोस्कर.

## काव्य–परामर्श

'नवें काव्य' आणि 'जुनें काव्य' यांच्या आजच्या संधिकालांत सामान्य काव्यरसिकाचा मोठा गोंधळ उडून गेलेला आहे. स्थूल मानाने नवें काव्य हा गेल्या पांच वर्षांतील आविष्कार आहे व ज्यास आज 'जुनें' म्हणण्याचा प्रसंग आलेला आहे, तेंहि गेल्या २५ वर्षांत दृढमूल झालेल्या केशवसुत, तांबे आणि रविकिरणमंडळ यांच्या संप्रदायांतील आहे. परामर्श घ्यावयाच्या पुस्तकांमधील 'नवी मळवाट' (शरच्चंद्र मुक्तिबोध), 'हळवें भिंग' (य. द. भावे), 'आणखी कांहीं कविता' (बा. सी. मर्ढेकर) हीं तीन पुस्तकें नव्या काव्यांत मोडतात; 'स्फूर्तिनिनाद' (काव्यविहारी) खास केशवसुती परंपरेंतील आहे; 'आनंद-भैरवी' (बा. भ. बोरकर) व 'जीवनसरिता' (द. गं. पाळंदे) हे तांबे संप्रदायांत बसतात; 'नजराणा' (वा. ज्यो. देशपांडे) हें रविकिरणमंडळाचें निशाण उघडपणें मिरवीत आहे; 'विजयिनी' (सुधांशु), 'छिन्नध्वज' (शरद्), 'चटके आणि गहिंवर' (वि. द. आपटे) आणि चापेकळ्या (डॉ. द. वा. चाफेकर) हे संग्रह वर निर्देशिलेल्या संमिश्र जुन्या प्रवाहांत जमा

होतात. ' अन्तर्भेद ' ( बा. ग. कोटणीस ) हें ऐतिहासिक खंडकाव्यहि अर्थात् जुन्या जमान्यांत जमा होणारें आहे. ' विश्व-मानव ' ( ना. ग. जोशी ) यांचें स्थान मात्र वेगळेंच आहे.

नवकाव्यांतील दोन कवींनी नवकाव्याची आपआपली कल्पना प्रस्तावना लिहून प्रकट केली आहे. मर्ढेकर स्वत: कांहीच बोलत नाहीत. पण य. द. भावे व मुक्तिबोध यांनी लिहिलेल्या प्रस्तावनांतून नवीन मानवतेचा आशय, नवीन प्रतिमा, नवीन छंद यांचा आविष्कार हा नवकाव्याचा महत्त्वाचा भाग आहे असें म्हणणें दिसतें. पण मुक्तिबोध हे आपली नवकाव्याची धारा ही वेगळी आहे, व त्यांनी नामनिर्देश न केला तरी, भावे आणि मर्ढेकर यांची धारा वेगळी असल्याचें सांगतात. आपली धारा ही अधिक समाजवादी, आशावादी असल्याचा ते अधिकार सांगतात, व दुसरी धारा अहंवादी, तुच्छतावादी, त्रयस्थाची भूमिका घेणारी आहे असें म्हणतात. त्यांच्या मताप्रमाणे ही दुसरी धारा ज्या निराशामूलक ऱ्हासकालीन विचारसरणीवर फोफावते आहे, तिच्या नाशाबरोबरच नष्ट होणारी आहे. नवकाव्याचे हे जे तीन प्रतिनिधि आहेत, त्यांच्यामध्ये एकवाक्यता पाहण्याचा प्रयत्न करणें योग्य होणार नाही. पण कोणाच्या काव्यांत इतरांशीं समान असें काय निघतें तें पाहणें मोठें मनोरंजक आहे. मुक्तिबोध व भावे मुक्तच्छंदाचा आश्रय करीत असले तरी मर्ढेकर मुक्तच्छंद केव्हाच लिहीत नाहीत. केव्हा केव्हा निर्यमक रचना ते करितात व केव्हा ओवीसारख्या गद्यप्राय छंदाचा उपयोग करतात. परंतु ज्यास आज मुक्तच्छंद म्हणतात, तो मात्र केव्हाहि योजीत नाहीत. भावे हे आपल्या भाषाविषयक अप्रभुत्वाला जुळणारा मुक्तच्छंदच बहुधा पसंत करितात, व मुक्तिबोध भाषेचें प्रभुत्व व सफाई असूनहि त्याचाच आश्रय मोठ्या कलाकुसरीने करतांना दिसतात. नवीन प्रतिमानांबाबत मुक्तिबोध त्यांतल्या त्यांत मागेच आहेत; मर्ढेकर व भावे यांचें स्थान याबाबत पुढे आहे. भावे यांच्या कवितांत कांही पौराणिक उल्लेख आले, तरी त्यांची विचारप्रक्रियाच इंग्रजींतून चालत असावी असें वाटतें, व मर्ढेकरांच्या बाबत हें इंग्रजी विचाराचें प्रमाण कमी असलें तरी एकंदरींत त्यांचा मन:पिंड इंग्रजी वाङ्मय व विचार यांवर पोसलेला आहे असें दिसतें. मुक्तिबोध नवीन प्रतिमानांची आपल्या आशयावर कुरघोडी होऊं देत नाहीत; त्यामुळे त्यांना काय म्हणावयाचें आहे तें अधिक सुगम असतें. मर्ढेकरांच्या प्रतिमा नवीन असल्यामुळे व त्यांच्या काव्यलेखनांत साधनांचा मितव्यय बराच असल्याने त्यांच्या कवितेंत दुर्गमता शिरते. भावे यांच्या कवितांत प्रतिमानांचें नावीन्य असलें, तरी त्यांच्या योजनेंत संयम नसतो, व आशयापेक्षा प्रतिमांचें दास्य स्वीकारून व गद्य, रूक्ष व किळस उत्पन्न करतील अशा प्रतिमांसहि लेखनांत स्थान देऊन ते रचना करीत असल्याने त्या काव्याबद्दल आकर्षण उत्पन्न होण्यापेक्षा विरक्तीच उत्पन्न होते. बीभत्सास अधिक जवळ असणारें नवकाव्य त्यांचेंच आहे. मर्ढेकरांच्या या नवीन कवितांत तो भाग अल्प आहे, व मुक्तिबोधांच्या कवितेंत त्याचा उपयोग आशयास पुष्टि देण्यापुरताच आहे. स्वत: भावे यांची काव्यप्रक्रियेविषयींची भूमिका म्हणजे कवीच्या मनाची परिस्थितीस होणारी अनेकमुखी व जाणीवनेणीवमिश्र अशी प्रतिक्रिया या स्वरूपाची आहे. या प्रतिक्रियेस कांही सुसंघटित व कलात्मक स्वरूप देण्याइतका धीर कवीस नसल्यामुळे स्वतः त्यांनीच म्हटल्याप्रमाणे ' अधू झालेल्या गर्भाशयांतून अपुऱ्या दिसांचें जसें बालक ' बाहेर पडावें तशी त्यांच्या काव्याची स्थिति झालेली दिसते. सारखें प्रतिमानांच्या ( आणि तींहि सर्वमान्य नसलेलीं अशीं असतात ) भाषेंत बोलत राहिल्याने मुख्य आशयाचें रूप सरळपणें व्यक्त होणें कठिण जातें. त्यांतहि संमिश्र प्रतिमानांच्या ( Mixed Metaphor ) अतिरिक्त उपयोगाने आणखी गोंधळ होतो.

आताच उल्लेखिलेल्या लहानशा कवितेंत कवीचें मन पहिल्या पांच ओळींत एक जलाशय आहे, दुसऱ्या दोन ओळींत विरलेली झोळी आहे, व पुढील चार ओळींत अधू झालेलें गर्भाशय आहे. या गर्भाशयांत प्रतिमासुद्धा फार काळ ठरूं शकत नाहीत असें दिसतें. मर्ढेकरांच्या कवितांत हा भाग कमी, पण आपल्या म्हणण्याचा अर्थ ते जाणून बुजून गूढ करितात की काय असें वाटतें. आपले भक्त आपल्या बोलण्याचें मोठें गूढ व कौतुक करतात असें कळल्यावर ज्याप्रमाणे पूर्वकालीन कांही गुरु संक्षिप्त व तान्त्रिक बोलण्याचा अधिकच प्रकार करीत, व आपण आपल्या या तथाकथित भक्तमंडळींबद्दलहि बेफिकीर आहोंत असा आविर्भाव आणीत, तसें मर्ढेकरांचें होऊं लागलेलें दिसतें. इरेस पडलों तर तुम्हांस समजेल असें मीहि लिहून दाखवीन असें ते बजावतात, याचा अर्थच असा की असें ' मी मुद्दामच लिहित नाही ' असें त्यांना म्हणावयाचें आहे. त्यांच्या या पद्धतींचा अनुभव पुढील लहानशा चार चरणी कवितेमध्येहि येईल. ' शांदीला पण सोवळयांत जो । आजवरी हा देव ठेवला । धरावयाच्या मुळ्या फांदिने । ओवळ्यांत तर प्रभूस ढकला । यांतील उत्तरार्धातील शब्द–रचना अशी झाली आहे की त्यास गूढ रूप सहज यावें. मर्ढेकरांनी या चार ओळी त्यांच्या कविमनाच्या गर्भाशयांत पुरेसा काळ राहिल्या नसतांनांच कांही बाहेर टाकलेल्या दिसत नाहीत. पण वाचकाने कष्ट केल्याखेरीज त्याला आपला अर्थ कळूंच नये अशा कलन्दरी मिस्कील वृत्तीने त्यांनी त्या तशा ठेवल्या आहेत हें स्पष्ट दिसतें. असें न म्हटल्यास व्याकरणशुद्ध, स्वच्छ पद्धतीने त्यांना लिहितांच येत नाही असें म्हणण्याचा प्रसंग यावयाचा; आणि याचें तर नवकाव्याच्या व त्याच्या प्रणेत्यांच्या भक्तांस मोठें भय वाटतें. इंग्रजींत धूर्त किंवा बावळट यांपैकी कांही तरी एक असण्यासंबंधी एक प्रसिद्ध वचन आहे. त्यांतील दुसरें विशेषण लावण्याची सोय नसली, म्हणजे पहिलें लावण्यांत येतें; त्यापैकीच हा कांहीसा प्रकार होतो. मुक्तिबोधांची कविता त्यांच्या भारदस्त शैलीने व भाषेमुळे क्लिष्ट वाटते हें खरें, पण वाचकांस ती कोडें होऊन बसत नाही. मर्ढेकरांची कविता कोडें होत असल्याने त्याचें स्वाभाविक आकर्षण कित्येकांस ती वाचावयास लागतें; भावे यांच्या कवितेबद्दल कोडें असल्याची भावनाहि होत नसल्याने आकृष्ट होण्याऐवजी परावृत्त होणारे वाचकच अधिक सापडतील.

आशयाविषयींचा भावे व मुक्तिबोध या दोन कवींचा दावा अन्तीं एकच दिसतो. आजची सामाजिक स्थिति अत्यंत विषम आहे, तीमध्ये कांही जीवांची स्थिति अत्यंत अनुकंपनीय आहे, चीड आणणारी आहे. ती बदलून म्हणजे तीमध्ये क्रांति करून सामाजिक समतेची म्हणजेच मानवतेची स्थापना केल्यावाचून जीवन हें सुखावह होणार नाही, हेंच दोघांना सांगावयाचें आहे. मुक्तिबोधांच्या भारदस्त भाषेमुळे ही चीड उत्कटतेने प्रकट होत नाही. भावे यांच्या कवितेंत ती उघडीनागडी व्यक्त केल्याने उत्कट, पण विरूप होऊन बाहेर पडते. मर्ढेकरांच्या कवितेंत तुच्छतेचा, हिणवण्याचा, भाग अधिक आहे. मुक्तिबोधांच्या मताने त्यांना आशावाद नाही, ते सहानुभूतीच्या वृत्तीने वागण्यापेक्षा टीकाकाराच्या वृत्तीने वागतात. भावे व मर्ढेकर या दोघांनाहि यंत्रयुगामुळे माणसानें चिपाड झाल्याची खात्री झाली आहे. मुक्तिबोधांना यंत्रयुग इतकें तिरस्करणीय वाटत नाही. वस्तुत: मानवतेचा आशय केशवसुत-कालीन समतेच्या आशयापेक्षा विशेष भिन्न नाही. फक्त आर्थिक दैन्याने निर्माण झालेली विपन्नावस्था अधिक तीव्रतेने यांत प्रकट होते. यांतून कसें बाहेर पडावें हें मर्ढेकर सुचवूं शकत नाहीत. तें करणें कवीचें कामहि नाही व त्याला शक्यहि नाही. मानवतेची स्थापना झाली पाहिजे असें पुनः पुनः सांगूनहि तें सिद्ध होईल असें नाही. त्याबद्दल आपण आशा बाळगून

आहों व मर्ढेकर नाहीत एवढ्याने खरोखर आपली नवकाव्याची धारा अधिक चांगली असें म्हणण्यास मुक्तिबोधांना विशेष आधार आहे, असें नाही. आशयाबद्दलचा हा दावा व वैषम्याविषयीच्या रोषाचें उघड प्रकटन हींहि आता अतिपरिचित होऊं पहात आहेत.

नवकाव्याविषयी लोकांत आज जें कुतूहल व असमाधान उत्पन्न झालें आहे त्यांतून 'नव–काव्य–समीक्षा' या नांवाची जी टीका श्री. स. वा. दीक्षित यांनी प्रसिद्ध केली आहे, तिजकडे वाचकांचें लक्ष वेधणें आवश्यक आहे. नवकाव्यासंबंधीच्या बऱ्याच गोष्टी त्यावरून लक्षांत येतील. नवकाव्य आस्थेने वाचून त्यांची झालेली प्रतिक्रिया जरा तीव्र असली, तरी स्वाभाविक वाटते. तथापि तिची तीव्रता मर्यादेंत ठेवून त्यांनी ही नवकाव्यटीका लिहिली असती, तर तिचें मोल अधिक वाढलें असतें. काव्यपरामर्शाच्या या लेखांत त्यावरील टीकेचा परामर्श तितकासा येत नसल्याने यापेक्षा अधिक त्याविषयी येथे लिहितां येत नाही.

नवकाव्याच्या नगाऱ्यापुढे एका काव्यप्रयोगाकडे रसिकांचें जावें तसें लक्ष जात नाही. तो प्रयोग म्हणजे ना. ग. जोशी यांच्या 'विश्वमानव' या खंडकाव्याचा. हें जवळजवळ दहा वर्षे लिहिलें जात होतें. त्यांतील दहा खंडांतून एका मानवाने नव्हे, पण एकंदर मानवतेने निसर्गाशीं झगडून मानव्याची ज्योत कायम राखण्याचें कार्य कसें युगायुगांतून चालविलें आहे याचीं चित्रें काढण्याचा प्रयत्न आहे. कवीने चाळीस सालीं जेव्हा याच्या लेखनास प्रारंभ केला, तेव्हा त्याचें रूप काय व्हावें याची त्यालाहि कल्पना पूर्णपणें नव्हती असें दिसतें. त्यांतील शेवटला म्हणून दिलेला खंड १९४४ चा आहे, पण आठव्या खंडांत तदनंतरच्या महात्माजींच्या हत्येचा प्रसंग आलेला आहे. या काव्यांत एकसूत्री कथानक नाही; परंतु अनेक कथाप्रसंग आहेत. लेखनशैलीच्या दृष्टीने कवि आरंभाला सावरकरांच्या छायेंत असल्यासारखें वाटतें. पुढे मुक्तच्छंदाचा स्वीकार व क्वचित् "मुक्त (गद्य?) शैली' चाहि स्वीकार त्याने केला आहे. 'एपिक् ऑफ ग्रोथ' प्रमाणे यांचें हें काव्य आधी नीट आराखडा निश्चित न करतांच सुरू झालेलें दिसतें. त्यांची पद्धतिहि या नवीन पद्धतीच्या महा–काव्याची, म्हणजे मिल्टनी, अथवा सावरकरी प्रौढगंभीरतेची आहे. ती भारवत्तेमुळे क्लिष्ट झाली असली, तरी मधूनमधून काव्यरसाचीं कारंजींहि यामध्ये दिसतात. पण एकंदर जें सांगावयाचें आहे, त्याबद्दल त्यांचा निश्चय पुरा झालेला दिसत नाही. मानव हा या झगड्यांत जिंकतो असें सांगणें हें आपलें कर्तव्य आहे असें तर त्यांच्या मनाने ठाम घेतलेलें दिसतें, पण त्यांची तशी आंतरिक खात्री झाल्यासारखें वाटत नाही. ल्यूसीच्या कथेत भोळसट श्रद्धेची भलावण करूनहि ती अंतीं हितावह झाल्याचें दाखवितां आलें नाही. 'कत्तलच्या रात्री' मध्येहि दीन मानवाची असहायताच वर्णिली आहे. शेवटच्या खंडांत शेवटीं कवि म्हणतो:—

स्थूल भूतात्मक वासना नाचती उघड्यानागडया बेहोष होवोनी
तया झांकाया विणिली ओढणी, सुंदर मोहक तलम घाटणी
मानव्याच्या नि लोकशाहीच्या गोड वल्गनांची !
नजरबंदी त्यांची विषारी, झांकून झाकेल कैशी नाशकारी ?
परंतु नाही विवेकाची आता उरली जाणीव; हे विश्वमानव !
असंख्य युगांचा चक्रनेमिक्रम भिरभिर फेऱ्या अशाच करील;
प्रलय पुन्हा सृष्ट संस्कृतींना ग्रासून टाकील

७

असें असूनहि वर म्हणणें आहेचः—

परंतु शेवटीं प्रज्ञाशक्तीचें आत्मज्योतीशीं होईल मीलन.

तेव्हाच मूळचें एकत्व दिसेल, पुन्हा अभिनव, हे विश्वमानव !

काव्यांत तात्त्विक विचारसरणी आणावयाची असेल, तर ती तर्कशुद्ध असावयास पाहिजे. काव्याचें मूल्य ठरवितांना त्यांतील तात्त्विक विचारसरणीला अधिक महत्त्व द्यावयाचें, व ती अ–तर्कशुद्ध आहे म्हटल्यावर हें काव्य आहे असें म्हणावयाचें असें मात्र होऊं नये. मानव्याच्या भवितव्याविषयी स्वतःलाच खात्री नसतां, तें उज्ज्वल आहे असें नुसतें गजनिमीलिताचा स्वीकार करून लिहिण्याने भागणार कसें ! पण हा कच्चा भाग सोडल्यास महान् कल्पनेचा आश्रय करून त्यावर सतत उद्योगानें व्यासंग करून काव्य लिहिण्याचा केलेला प्रयोग म्हणून काव्याच्या वाचकांनी त्याकडे दुर्लक्ष करितां कामा नये.

'जुनें काव्य' —

नवीन किंवा 'नव' कवितेची स्थिति अशी आहे. या मानाने आता 'जुनें' ठरविण्यांत येणारें काव्यहि गेल्या वर्षांत बरेंच प्रकाशित झालें आहे. यांत तीन कवींचे कवितासंग्रह हे कांही प्रथमच निघताहेत असें नाही. 'स्फूर्तिनिनाद' हा काव्यविहारी यांचा तिसरा संग्रह आहे, बोरकरांची 'आनंदभैरवी' हा त्यांचा निदान चौथा संग्रह आहे व 'चटके आणि गहिंतर' हा इंदूरच्या 'माला' कर्ते आपटे यांचा दुसरा संग्रह आहे. बोरकरांनी आपल्या संग्रहास एकच वाक्याची प्रस्तावना लिहिली आहे. तींत ते म्हणतात, 'माझ्या भावसंगीताची ही भैरवीहि असेल, पण ती मीं आनंदानें गायिलेली आहे. काव्यविहारींचें निवेदन हें अधिक मोठें पण अधिक ठराविक स्वरूपाचें आहे. 'माला' कर्ते आपटे यांनी मात्र एक चाळीस पानी प्रस्तावना लिहून आपले काव्याविषयक आणि नवकाव्याविषयक विचारहि सविस्तर मांडले आहेत. बोरकरांची कविता ही आपली अखेरची भावकविता ठरण्याचा संभव त्यांनी कां सूचित करावा हें समजत नाही, पण 'महात्मायना'च्या लेखनांत गुंतल्यामुळे स्फुट भावगीतांची रचना दुर्लक्षित होत असावी. आपली ही कविता 'आनंदाने लिहिली गेली आहे' असें सांगण्यांत 'नव काव्या'वर सूक्ष्म पण यथार्थ टीका करण्याचा त्यांचा विचार दिसतो. पण त्यांच्याहि कवितेंत दुःखाच्या सावल्या उमटल्यावाचून राहिल्या नाहीत. मात्र तें संयत आहे. नव्याने लिहूं लागणाऱ्या माणसाच्या लेखनाप्रमाणे उत्तान वा उघडें व अ–कलात्मक नाही. बोरकरांच्या लेखणींत आता पक्केपणा, सफाई. आत्मविश्वास या गोष्टींचा भरपूर प्रत्यय येत आहे. सौंदर्याची पूजा व आविष्कार हीच त्यांच्या काव्यात्म जीवनाची किल्ली असल्याचें याहि संग्रहांत दिसतें. भावगीत हें गीत आहे याची विस्मृति त्यांना कधीहि होत नाही, परंतु आता त्यांच्या काव्याची पदवी व स्वरूप ठरल्यासारखें वाटतें. त्यांच्या पूर्वीच्या काव्यापेक्षा कांही अधिक यांत आलेलें असल्यास तें अधिक सौंदर्य वा नावीन्य नसून रचनेची सफाई व विचारांचें गांभीर्य हें होय. आधीचीच उंच असलेली पदवी यांत सुटली नसली, तरी वाचकांच्या हावरेपणाचें समाधान या संग्रहाने होणार नाही.

काव्यविहारींच्या कवितेसंबंधानेहि हीच स्थिति झाली आहे. त्यांच्या काव्याचे विषय व ते हाताळण्याची त्यांची पद्धति आता ठरून गेली आहे. साध्या विषयांत मोठा आशय पाहण्याची त्यांची सवय कायम आहे. सौंदर्यदर्शनापेक्षा जिव्हाळ्याचा भावनाविष्कार साध्या सडेतोड अशा भाषेंत करणें हेंच त्यांच्या कवितेचें ध्येय होतें; अजूनहि तेंच आहे.

त्यामुळे वस्तुतः काव्यविषय भिन्न असले, तरी 'त्या त्याच अर्थाप्रति दाविताति' अशी त्यांच्या कवितेची स्थिति झाली आहे. आपण क्रांतिकालांतून जात आहोंत याची जाणीव त्यांना आहे, पण त्याकरिता आपल्या कवितेचें स्वरूप बदलण्याची आवश्यकता त्यांना वाटत नाही. केशवसुती साधेपणानें, पण तांबे यांच्या गीतपद्धतीने ठराविक प्रकाराने आत्माविष्कार करावा हेंच त्यांच्या कवितेचें स्वरूप आजहि आहे. बोरकरांच्याप्रमाणे त्यांनाहि मुक्तच्छंदाची 'बाधा' झालेली नाही. किंबहुना 'जुनें काव्य' म्हणून ज्यांच्या कवितेचा येथे परामर्श घेण्यांत येत आहे, त्यांपैकी कोणालाच ती झालेली नाही.

आपटे यांच्या 'चटके आणि गहिवरांत' नांवास साजेशी रचनाच एकत्रित करण्यांत आली आहे. त्यांची वृत्ति विचारप्रवण आहे; आणि ह्या विचारांत कांहीशी तीव्रता आहे. त्यांतील चटके हे त्यांना स्वतःला बसलेले असण्यापेक्षा त्यांच्या काव्याचा विषय झालेल्या व्यक्तींना बसतात. गहिवर मात्र त्यांना स्वतःला आलेला आहे, वाचकांना येणारा फारसा नाही. वाचकांना गहिवर आणण्यापेक्षा टोचणी लावण्याचाच त्यांचा प्रयत्न दिसतो, व अनेक वेळा तो सविस्तर होतो. त्यांच्या अशा सार्वजनिक विषयावरील कवितांपेक्षा 'ह्यांचा स्वभाव,' 'अमृतवृष्टि' इत्यादि कौटुंबिक जीवनावरील कविताच वाचकाच्या लक्षांत राहतील. आपटे यांची लेखणी समर्थ व ओघवती आहे; त्यामुळे मनांतील आशय सहजतेने व ओजस्वितेने ते प्रकट करूं शकतात.

आपण आधी निर्माण केलेल्या पात्रांतूनच वाहण्याचें बंधन ज्यांच्या काव्याला खरोखर नव्हतें, म्हणजे ज्यांचे आधीचे संग्रह प्रसिद्ध नाहीत अशांचे कवितासंग्रहहि या वर्षी प्रसिद्ध झाले. त्यांत 'नजराणा,' 'जीवन–सरिता,' 'छिन्नध्वज,' 'चाफेकळ्या,' 'शरत्प्रभा,' इत्यादि संग्रहांचा समावेश होतो. हे संग्रह त्या त्या कवींचे पहिले संग्रह असले तरी ते कविता मात्र नव्याने करूं लागलेले नाहीत. कित्येकांनी तर काव्यसेवा गेल्या पंचवीस वर्षांपासून चालू ठेविली होती. 'शरत्प्रभा' कर्ते प्रा. वि. अ. कुलकर्णी यांचा व्यासंग व व्यवसाय वाङ्मयाचा. यांची काव्याभिरुचि मात्र परंपरागत दिसते. त्यांच्या गुरुपरंपरेतील श्री. नी. चाफेकर यांच्या काव्याभिरुचीची छाया या संग्रहावर पडलेली दिसते. त्यांच्या एकावली–प्रमाणे यांच्याहि अनेक कविता स्फुट स्वरूपाच्या आहेत. अक्षरगणात्मक रचनेचें दर्शन या संग्रहांत बरेच वेळा होतें. समकालीन सामाजिक वा राजकीय प्रश्न किंवा घटना कुलकर्णी यांना त्रस्त करीत नाहीत. वयाने त्यांनी तांबे किंवा रविकिरण युगांत असावयास पाहिजे होतें, पण मनाने ते केशवसुत-युगापर्यंतहि आल्यासारखें वाटत नाही. त्यामुळे 'जुने' या शब्दाच्या नव्या अर्थानेहि त्यांचें काव्य नुसतें 'जुनें' न ठरतां 'प्राचीन' ठरण्याची भीती वाटते. 'नजराणा' कर्ते वा. ज्यो. देशपांडे हे यांचेच समकालीन, पण त्यांनी रविकिरणमंडळाचें निशाण उघड उघड डोक्यावर धरलेलें आहे. विशेषतः गिरीश व यशवंत यांची गुरुपरंपरा मानणारे हे दिसतात. गुरूंच्या आधीच्या उज्ज्वल काव्ययशामध्ये यांच्या काव्याची प्रभा विशेष वेगळी दिसत नाही. आपल्या गुरूंचा हा सच्छिष्य त्यांचें अनुकरण निष्ठेने करीत असला तरी त्याची निष्ठा त्यास स्वतंत्र असें स्थान मिळवून देऊं शकत नाही. उस्ताद गवयाच्या साथीदाराप्रमाणे त्यांची स्थिति झालेली आहे.

या दोन वाङ्मयव्यवसायी कवींच्यापेक्षा निराळ्या व्यवसायांतील कवींनी आपले काव्यसंग्रह काढून आपला हौशी पेशा व्यक्त केला आहे. 'जीवनसरिता' कर्ते श्री. द. ग.

पाळंदे हे खरोखर जमाखर्ची किंवा तत्सदृश अशा पेशांतील गृहस्थ. आपला काव्यसंग्रह चाळिशी उलटल्यावर प्रसिद्ध करण्यांत कविजनांस स्वाभाविक नसणारा संयम त्यांनी प्रकट केला व आजहि मोठ्या विनीतवृत्तीनेच त्यांनी तो रसिकांपुढे मांडला आहे. तांबे यांच्या वास्तव्याने भारलेल्या परिसरांत राहिल्याने पाळंदे यांच्या कवितेवर तांबे यांच्या कवितेची दाट छाया पडलेली दिसते. तीमध्ये लेखकाची रसिकता व काव्यविषय निवडण्याची योग्य दृष्टि प्रकट झालेली असली, तरी तांबे यांची झळक व रचनासहजता तीमध्ये उतरलेली नाही. त्यांचा काव्यलेखनाचा व्यासंगहि सततचा नसल्याने रचना निर्दोष अशी प्रकट होत नाही. अशा स्थितींत तीमध्ये कवीची रसिकता व काव्यप्रेम यांपेक्षा विशेष कांही अधिक पाहण्याचा प्रयत्न निष्फळ ठरेल.

व्यवसायाने वैद्यकी करणारे कारवारचे शरद् आणि गदगचे डॉ. चाफेकर यांनीहि आपली रचना 'छिन्नध्वज' आणि 'चाफेकळ्या' या नांवाने रसिकांपुढे सादर केली आहे. रविकिरणाच्या ऐन अमदानीमध्यें 'शरद्' हे संस्कारक्षम अशा वयांत पुण्यास राहिल्याने साहजिकच त्यांची कविता त्या वळणाची झाली आहे. पण मनाने ते तेथेच राहिले नाहींत. 'क्रांतीचा उद्‌घोष,' 'एक जगाची कल्पना,' 'स्वातंत्र्यदिनाचा महोत्सव' अशा कवितांनी ते केवळ सामाजिक क्रांतीचे पुरस्कर्ते नसून त्या त्या युगकल्पनेच्या मागोमाग जाणारे आहेत असें कळतें. यांच्याहि बाबतीत व्यवसायप्रतिकूलतेमध्ये काव्याची हौस कायम ठेवण्याच्या त्यांच्या गुणाचें कौतुक करणें हेंच अधिक शक्य असल्याचें आढळून येतें. 'चाफेकळ्या' कर्ते डॉ. चाफेकर यांच्या कवितेंत मात्र सहज अशी खेळकर काव्यरचना झालेली पाहून रसिकाचें मन अधिक रंगतें. तींत कोणताहि संप्रदाय दिसत नाही. विषयांत विशेष चोखंदळपणा न स्वीकारतां 'स्फुरेल तशी लिहिली कविता' हा प्रकार येथे झाल्यामुळे तींत एक प्रकारची जिवंत सहजता आली आहे. 'भाज्यांचा संवाद' लिहिणाऱ्या कवीस 'औदासीन्य' या आधुनिक पद्धतीची कविता सुचली ही गोष्ट लक्षांत भरण्यासारखी आहे. तीमध्ये नवीन कवितेची दुर्बोधता नसतांनाहि संज्ञा-प्रवाहाचें चित्र व मानवी जीवनाविषयीचे विचार मोठ्या सहजतेने प्रकट झाले आहेत. पण कवीने इतरत्र आपली रचना कविता म्हणून गंभीरपणें वाचकांपुढे मांडलेली दिसत नाही. तो स्वतःला कवि म्हणवून घेण्यापेक्षा 'रचणार' म्हणवून घेतो.

सुधांशु यांचा कवितासंग्रह 'विजयिनी' या नांवाने त्यांनी प्रसिद्ध केला आहे. नांवापाठीमागे कांही विशेष हेतु असल्याचे दिसत नाही. ग्रामीण प्रकाशनाचें हें सहावें पुष्प आहे व कवि ग्रामीण भागांत राहणारा. असें असूनहि अगदी नवकाव्य सोडल्यास त्या आधीच्या परंपरा त्यांनी आत्मसात् केलेल्या दिसतात व रचनेवर सामान्यापेक्षा पुष्कळच चांगलें प्रभुत्व त्यांनी मिळविलें आहे. त्यांच्या या संग्रहांत कवित्वाचा उन्मेष चांगल्यापैकी झालेला आहे. कोणाचें क्रांतिप्रेम, कोणाची हुरहूर, कोणाची गीतभक्ति, कोणाची प्रेमप्रीति अशा विशेषांची वेंचणी करून सुधांशूंनी आपला हा नवा काव्यसंसार थाटलेला आहे. त्यांत रचनेचें प्रभुत्व दिसतें, विचारांची वा भावनांची पृथगात्मता दिसावयाची आहे. त्यांच्या कवितेकडे लक्ष ठेवणें अगत्याचें वाटतें.

कोटणीसांचें 'अन्तर्भेद' हें काव्य एक ऐतिहासिक कथाकाव्य आहे. नवकाव्यापुढे तथाकथित 'जुन्या' काव्याला अंग चोरून वावरण्याचा प्रसंग आल्यावर ऐतिहासिक दीर्घ

काव्याचा काल उरला आहे असें म्हणणारा फार आशावादी ठरेल. 'विश्वमानवा'च्या चर्चेत गुंतलेला रसिक शिवरायासारख्या स्थानिक 'राष्ट्रीय' विभूतीच्या विचाराकडे कसा आकृष्ट व्हावयाचा ! कोटणीसांनी हात घातला तो मुळांतच या आज सनातनी ठरणाऱ्या विषयाला. ऐतिहासिक काव्याची भाषा व पद्धति आता रूढ होऊन बसलेली आहे. कोटणीसांच्या भाषेंत व रचनेंत प्रसाद आहे, त्यांच्यामध्ये राष्ट्रीयत्वाचा अभिमान आहे, दीर्घ लेखनाची चिकाटी आहे; पण या सर्वांचा उपयोग कवियश मिळविण्यास किती होईल तें मात्र सांगवत नाही. जीवनांतील इतर व्यवहाराप्रमाणे काव्यांतहि कालाबरोबर जाणें किंवा सर्वस्वीं वैशिष्ट्य आणि पृथगात्मता हीं प्रगट करणें याशिवाय प्रतिष्ठेचा लाभ होणें कठिण आहे.

प्रस्तुत काव्यपरामर्शांत एकेका काव्यसंग्रहाचा विस्तृत परामर्श घेणें शक्य झालें नाही याची जाणीव मला आहे. परंतु परीक्षणापेक्षा पत्रिकेच्या वाचकांस आजच्या काव्याचा परिचय करून द्यावा या मर्यादित हेतूने व मर्यादित पृष्ठसंख्येच्या बंधनांत केलेल्या या लेखनांत अधिक करणें अशक्य होतें हें लक्षांत घेऊन कविजनांनी उदार अंतःकरणाने लेखकास क्षमा करावी असें लिहिण्यापेक्षा तो अधिक तें काय करणार !

रा. श्री. जोग.

# संपादकीय

पत्रिकेच्या मागच्या अंकानंतर हा अंक सहा महिन्यांनी निघत आहे व यापुढील १०० वा अंक पुढील वर्षाच्या मार्चमध्ये निघेल. शंभरावा अंक १०० पानांचा काढण्याचा संकल्प असून त्यांत मराठी वाङ्मयाच्या भिन्न भिन्न शाखांतील सद्यःपरिस्थिति काय आहे, त्या त्या शाखांतील वाङ्मयाचा संभाव्य ओघ कोणत्या दिशेकडे आहे व इष्ट दिशा कोणती याबद्दल विद्वानांचे लेख द्यावे, व परिषदेचा इतिहास दहा वर्षांपूर्वीपर्यंत जो म. म. दत्तो वामन पोतदार यांनी आणून ठेवला आहे, त्याच्या पुढील वर्षांतील तिचा इतिहास थोडक्यांत द्यावा अशी योजना आहे. या योजनेस साहाय्य देण्याचें श्री. के. ना. काळे, श्री. वि. वा. आंबेकर, श्री. म. ना. अदवंत, श्री. वा. ना देशपांडे, श्री. रा. वि. ओतूरकर, श्री. वा. ल. कुलकर्णी, श्री. अ. म. जोशी, श्री. शं. रा. दाते, श्री. त्र्यं. गो. ढवळे, श्री. स. वि. आपटे, श्री. शं. गो. तुळपुळे, श्री. ना. ग. जोशी इत्यादींनी कबूल केलें आहे. आमची ही योजना पत्रिकेच्या वाचकांस मान्य होईल अशी आशा आहे.

× × ×

या निमित्ताने पत्रिकेच्या वाचकांस म्हणजेच साहित्य-परिषदेच्या सभासदांस विनंती करावयाची आहे. पत्रिकेचा छपाईखर्च हा परिषदेच्या सभासदांकडून मिळणाऱ्या वर्गणीच्या रकमेपेक्षाहि अधिक होतो ही गोष्ट वेळोवेळीं सभासदांना सादर करण्यांत येणाऱ्या परिषदेच्या आयव्ययपत्रकाच्या द्वारे कळविण्यांत येत असते. ही परिस्थिति परिषदेच्या व पत्रिकेच्या आर्थिक सुस्थितीच्या दृष्टीने स्पृहणीय नाही हें सांगावयास हवें असें नाही. सभासदांपुढे पूर्वी याबाबत आलेल्या सूचनांचा स्वीकार साधारणसभा करीत नाही असा अनुभव आलेला आहे. तेव्हा परिषदेच्या सभासदांस विनंती अशी की त्यांनी परिषदेचें सभासदत्व व पत्रिकेची वर्गणी यांचा आजवर घातलेला मेळ आता बाजूस ठेवावा. वर्गणी सभासदत्वाची असून पत्रिकेची नव्हे, व पत्रिका सभासदांना विनामूल्य मिळते ही खरी दृष्टि असावयास पाहिजे. सभासदत्वाबद्दल द्याव्या लागणाऱ्या वर्गणीमध्ये परिषदेचें इतिवृत्त तेवढें मिळावें व साहित्यपत्रिकेकरिता आणखी दोन रुपये तरी द्यावे लागावे ही भूमिका स्वीकारणें ही गोष्ट आता निकडीची होऊं लागली आहे. पत्रिकेची वर्गणी ऐच्छिक असावी व तहह्यात सभासदांनासुद्धा द्यावी लागावी. परिषदेच्या सभासदांनी या सूचनेचा अगत्याने विचार करावा.

× × ×

मुंबई सरकारने मुंबई राज्याची राज्यभाषा हिंदी करण्याचा संकल्प सोडून व विद्यापीठाचें शिक्षणाचें माध्यम हिंदी करण्याची सूचना करून प्रांतभाषांवर व त्या बोलणाऱ्या लोकांवर मोठेंच संकट घालण्याचें ठरविलेलें दिसतें. मुंबई प्रांत हा भाषादृष्टया एक संयुक्त प्रांत असल्याने, व त्यामधील कोणतीहि एक भाषा इतरांवर लादणें शक्य नसल्याने तिघांनाहि सारख्याच प्रमाणांत गैरसोयीची होईल अशी वेगळीच भाषा सर्वांवर लादण्याच्या या प्रयत्नाचा सर्वच भाषाभिमान्यांकडून प्रतिकार व्हावयास पाहिजे. जनतेच्या सोयीसाठी राज्यकारभार असावयास पाहिजे हें विसरून राज्यकारभाराच्या सोयीसाठी जनता असल्याची

ही उलटी कल्पना आहे. स्वातंत्र्योत्तर कालांत आपल्या देशांत आपल्यास सर्वत्र आपल्याच भाषेने व्यवहार करितां येईल व आपलें शिक्षण आपल्यास स्वभाषेने घेतां येईल या कल्पनेंत असणाऱ्या माणसांना हा एक मोठाच धक्का आहे. जिल्हाकारभाराच्या पदवीपर्यंत प्रांतभाषाच चालू आहेत व राहतील या आश्वासनाने कोणाचेंहि समाधान होणें शक्य नाही. वस्तुतः भाषावार प्रांतरचना मान्य केली म्हणजे मग इतरांवर त्यांची नसलेली भाषा लादण्याचा प्रश्न उपस्थित होत नाही. त्या त्या प्रांतांत ती ती भाषा निर्वेधपणें खालपासून वरपर्यंत कार्यकारी होऊं शकते. पण सरळ मार्ग न पत्करतां सर्वांनाच गैरसोयीचा असणारा मार्ग स्वीकारण्यांत असणारी औचित्यविसंगति राजकारणी लोकांना कळत नाही, किंवा कळूनहि लक्षांत घ्यावयाची नाही असेंच त्यांनी ठरविलेलें दिसतें. या गोष्टीचा वेळींच व जरूर त्या तीव्रतेने निषेध व प्रतिकार होणें आवश्यक आहे. विदर्भांत हिंदीबरोबर मराठीलाहि राज्यभाषेचें स्थान मिळालें असूनहि तेथे मराठीचे होणारे हाल व त्याबाबत विदर्भ साहित्य संघ करीत असलेले प्रतिकाराचे प्रयत्न प्रसिद्धच आहेत. मुंबईमध्ये एका हिंदीचाच पुरस्कार किती जाचक होईल याची कल्पना सहज येईल.

× × ×

कारवार येथील संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावाप्रमाणे ऑगस्टच्या दि. ४–५ ला म. सा. परिषदेच्या विद्यमाने भाषावार प्रांतरचनेबाबत विचारविनिमयाकरिता मराठी हिंदी व कन्नड साहित्यपरिषदांचे व गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटीचे प्रतिनिधि यांची पहिली बैठक झाल्याचें व प्रारंभिक विचारविनिमयानंतर अधिक प्रातिनिधिक अशी बैठक पुढे सवडीने घ्यावी असें ठरल्याचें वृत्त वर्तमानपत्रांतून येऊन गेलेंच आहे. त्या वेळीं हिंदी साहित्य संमेलनाचे प्रतिनिधि पंडित जयचंद्र विद्यालंकार यांनी घेतलेली हिंदीच्या अनाक्रमणाची भूमिका निःसंशय अभिनंदनीय होती. राष्ट्रभाषा म्हणून इंग्रजीविरुद्ध हिंदीचा पुरस्कार ते कितीहि हिरीरीने करीत असले, तरी आपआपल्या क्षेत्रांत प्रांतभाषेचें अनिर्बंध राज्य असणेंच तेथील जनतेच्याच नव्हे तर सबंध राष्ट्राच्या व लोकशाहीच्या हिताच्या दृष्टीने श्रेयस्कर आहे असें त्यांचें म्हणणें होतें. एवढेंच नव्हे, तर भाषिक सीमांच्या अनुरोधानेच त्या त्या भाषांची संस्कृति व अस्मिता फार प्राचीन कालापासून नांदत आल्या आहेत, व तीच त्यांची स्वाभाविक अशी स्थिति असते असेंहि त्यांचें मत आहे. हिंदीची साम्राज्यशाही इतर भाषिकांवर चालावी ही कल्पनाच त्यांना अमान्य आहे. हिंदी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांइतका हिंदीचा अभिमान इतरांना असणें शक्य दिसत नाही. पण ते जेथे प्रवेश करूं इच्छीत नाहीत, तेथे हिंदीचा अभिमान दत्तक घेणारे मुंबईचे राज्यकर्ते मात्र खुशाल संचार करीत आहेत. भाषावार प्रांतरचनेविषयी विचार करणाऱ्या साहित्यपरिषदांनीहि त्यांची ही भूमिका लक्षांत घेऊन सीमानिश्चितीच्या विचारांत भाषाविचारालाच अग्रस्थान देऊन मग इतर विचारांचा परामर्श घ्यावा हें उचित नाही काय ?

× × ×

म. साहित्य परिषदेची ही त्रैवार्षिकी कारकीर्द येत्या मार्च अखेर समाप्त होईल. त्रैवार्षिक निवडणुकीचीं चक्रें हळूहळू चालूं लागतील हें सभासदांना गेलेल्या याद्यांवरून त्यांच्या लक्षांत येईलच. साहित्य-परिषदेच्या सभासदांनी या निवडणुकींत लक्ष घालून मोठ्या उत्साहाने भाग घ्यावा अशी विनंती येथे करावीशी वाटते. निवडणुका बिनविरोध झाल्याने परिषदेचा खर्च वाचतो हें खरें असलें, तरी अनेक वेळा सभासदांच्या अनुत्साहाचें तें निदर्शक असतें हें इष्ट

नव्हे. निवडणुकीस पुष्कळ लोक उभे राहिल्याने त्या कराव्याच लागणार अशा वेळीं विचार-विनिमयाने कोणी कोणी माघार घेऊन इतरांस बिनविरोध निवडून दिलें तर तें उचित होईल. परंतु कित्येक वेळा पुरेसे उमेदवार नसल्याने बिनविरोध निवडणुकी होतात, त्या सभासदांच्या अनास्थेचें, अनुत्साहाचें लक्षण असतात. साहित्य-परिषदेची साधारण सभा संमेलनाच्या वेळीं भरते. त्यावेळीं गणसंख्येइतकीहि उपस्थिति भरण्याची अडचण पडते हेंहि सभासदांच्या आस्थेचें द्योतक नाही. निवडणुकींचे कांही तोटे असले, तरी त्यांमुळे जागृति निर्माण होते ही गोष्ट निर्विवाद आहे. साहित्यपरिषदेस सभासदांच्या जागृतीची, नित्य जागृतीची, नैमित्तिक नव्हे, गरज आहे; अनास्थेने निर्माण होणाऱ्या निर्वेधपणाची नाही.

× × ×

कारवार येथें गेल्या मे महिन्यांत जें संमेलन मोठ्या उत्साहाने साजरें झालें, त्यावर भलीबुरी टीका होऊन गेली आहे. कारवारकर मंडळींनी त्या वेळी प्रसिद्ध केलेल्या दोन ग्रंथांनी वाङ्मयविषयक कार्यहि आपल्या परीने केलें. पण एकंदर संमेलनावर साहित्यापेक्षा राजकारण अधिक झालें अशी जी टीका झाली ती लक्षांत घेणें आवश्यक आहे. येथेहि परिषदेच्या सभासदांची अनास्थाच बऱ्याच अंशांनी कारणीभूत आहे. परिषदेस उपस्थित असणें हें मराठी साहित्याचा ज्यांच्यावर मदार आहे अशांहि कित्येकांस आवश्यक वाटत नाही. विद्यापीठांकडे प्रतिनिधि पाठविण्याची विनंती करणारीं पत्रें गेलीं तरी, सर्वच विद्यापीठें त्यांची दखल घेतात असें नाही. महाविद्यालयांतून इतर विद्वत्-परिषदांना प्रतिनिधि पाठवतात, पण मराठीच्या परिषदेला आर्थिक साहाय्य देऊन प्रतिनिधि पाठविण्याची गरज अनेक महाविद्यालयांना वाटत नाही. कांही शाळा आपले प्रतिनिधि पाठवतात त्यांचें अनुकरण इतर शाळांनी करणें योग्य होईल. पण या सर्वांपेक्षा सभासदांनीच स्वयंस्फूर्तीने उपस्थित राहून भाग घेणें आवश्यक आहे. सभासदांच्या या जागृतीस पोषक म्हणून पुढील संमेलनाच्या अध्यक्षाची निवड आदल्या संमेलनास उपस्थित असणाऱ्या परिषदेच्या सभासदांनी करणें या उपायाचा प्रयोगहि करून पाहण्यासारखा आहे. कांही परिषदांमधून हें होतेंहि. सभासदांच्या उपस्थितीची खात्री नसतां स्थानिक माणसांना कोणत्याहि विस्तृत प्रमाणावर साहित्यिक कार्यक्रम अंगावर घेऊन ते यशस्वी करून दाखविणें शक्य होणार नाही. मुंबईसारख्या ठिकाणीं चर्चांमधून भाग घेण्यास आयत्या वेळी लोक उभे करितां आले, तरी बाहेर जिल्ह्याच्या ठिकाणीं या गोष्टी शक्य होत नाहीत. साहित्य परिषदेचें स्वरूप साहित्यिक रहावें ही गोष्ट सर्वच जण आता बोलूं लागले आहेत हें चांगलें झालें, पण हें कार्य परिषदेच्या सभासदांनीच अंगावाहेर टाकलें, तर स्थानिक स्वागत समितीला तें कसें साधणार? तसेंच आपले हक्क व अधिकार विसरून परिषदेच्या कार्यकर्त्यांनीच सर्व कामें करावीं अशी अपेक्षा करीत राहणेंहि योग्य नव्हे. एका मासिकाने संमेलनाची अध्यक्षीय खुर्ची अद्यापि कोणत्याहि स्त्रीला कां मिळूं नये अशी पृच्छा करून परिषदेच्या अधिकाऱ्यांनी याचा विचार करावा असें सुचविलें. अध्यक्षीय निवडणुकी म्हणजे खरोखरच सभासदांच्या हातांतील गोष्ट असून परिषदेचे अधिकारी अध्यक्ष बनवूं शकत नाहीत याचा विसर पडल्याने असें झालें. परिषदेच्या सभासदांच्या आस्थेवरच परिषदेचें यश अवलंबून आहे; संमेलनास आयत्या वेळीं उपस्थित राहणाऱ्या पाहुण्यावर नाही हें जितकें लवकर लक्षांत येईल तितकें बरें.

———

# परिषद्वार्ता

( चिटणीसांकडून )

**सभासदांस आग्रहाची विनंती :—** परिषदेचें नवीन वर्ष सुरू होऊन सहा महिने होत आले. सभासदांनी आपली वर्गणी पहिल्या तिमाहींत भरावयाची असते. मुदतींत वर्गणी न आल्यानें स्मरणपत्रें पाठवावीं लागतात व अंकाची नाअीलाजाने व्ही. पी. करावी लागते. प्रस्तुत गोष्ट उभयपक्षीं त्रासदायक आहे. तरी वर्गणी रु. ३ सत्वर पाठवावी.

**३४. वें महाराष्ट्र साहित्य संमेलन :—** प्रस्तुत संमेलन कारवार येथे 'मराठी वाङ्मय मंडळ' या संस्थेच्या वतीने दि. ३, ४, ५ व ६ मे १९५१ रोजीं सुप्रसिद्ध विद्वान् साहित्यिक श्री. अ. का. प्रियोळकर यांच्या अध्यक्षतेने भरलें. संमेलनाला जोडून नाट्यशास्त्र-संमेलन आचार्य अत्रे यांच्या अध्यक्षतेने भरलें. अेक नाट्यविषयक परिसंवादहि झाला. कला-प्रदर्शन, साहित्यविषयक प्रश्नांची प्रकट चर्चा, काव्यगायनासारखे करमणुकीचे कार्यक्रम अित्यादि संमेलनाचीं उपांगें म्हणून सांगतां येतील. संमेलनांत अेकूण २४ ठराव संमत झाले. आचार्य अत्रे, म. म. प्रा. पोतदार, श्री. लालजी पेंडसे, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री, ग. त्र्यं, माडखोलकर, श्री. ह. रा.महाजनी, श्री. र. के. खाडिलकर, श्री. अप्पा पेंडसे अित्यादींनी कांही ठरावांवरील चर्चेंत प्रामुख्याने भाग घेतला. वरील वक्त्यांशिवाय उपस्थितांत राजकवि य. दि पेंढरकर, श्री. अनंत काणेकर, प्रा. श्री. म. माटे, श्री. वि. द. घाटे, प्रा. अ. म. जोशी, श्री. प्र. गो. घाटे, श्री. रा. पु. सगदेव, श्री. पु. दि. ढवळे, प्रा. रा. श्री. जोग, श्री. शं. गो. पटवर्धन, श्री. वा. श्री. पुरोहित, श्री. बा. न. जक्कल, श्री. वा. रं. सुंठणकर श्री. श्री. शं नवरे, सौ. मालतीबाअी बेडेकर, पं. महादेवशास्त्री जोशी अित्यादि नामवंत साहित्यिक मंडळी उपस्थित होती. म. म. प्रा. पोतदार व प्रा. श्री. म. माटे यांची 'राष्ट्रभाषा राज्यभाषा- मातृभाषा' व 'ललितवाङ्मयाचें भवितव्य' या विषयांवर खास व्याख्यानें झालीं. महिला साहित्यिकांनीहि संमेलनांत भाग घेतला होता. अेकंदरींत कारवारसारख्या निसर्गसमृद्ध अशा रमणीय स्थानीं संमेलन फारच यशस्वीपणें पार पडलें. बाहेरील प्रतिनिधींची व्यवस्था ठेवण्याचें कामीं स्वागत मंडळाने अमाप परिश्रम केले. संमेलन यशस्वी करण्याचे कामीं डॉ. वामनराव वाघ (स्वागताध्यक्ष), श्री. ग. ना. कामत (कार्याध्यक्ष), श्री. दि. का. फातरपेकर (कार्यवाह), डॉ. व्यंकटराव कैकिणी, श्री. आनंद नाडकर्णी, श्री. दत्तू बांदेकर, डॉ. मुजुमदार, सौ. उषादेवी मुजुमदार अित्यादि कार्यकर्त्यांनी आटोकाट प्रयत्न केले. संमेलनांत संमत झालेले ठराव पुस्तिकारूपाने छापले आहेत. ज्यांना ते हवे असतील त्यांनी परिषदेकडे कृपया मागणी करावी.

**वार्षिक साधारण सभा :—**संमेलनाच्या अवधींत परिषदेची वार्षिक साधारण सभा राजकवि यशवन्त यांच्या अध्यक्षतेने शुक्रवार दि. ४।५।५१ रोजीं सकाळीं १०॥ वाजतां भरली होती. सभेस ५२ सभासद उपस्थित होते. प्रथम दुखवट्याचे ठराव होऊन मग सभेच्या कामास सुरवात झाली. मागील सभेचें अितिवृत्त, जमाखर्च व १९५१–५२ चें अंदाजपत्रक थोड्याफार चर्चेनंतर संमत करण्यांत आलें. पुढील संमेलनाचीं आमंत्रणें अहमदनगर, मध्य-भारत, अहमदाबाद या ठिकाणांहून आलीं होतीं. सभेने आमंत्रणांचा योग्य तो विचार करण्याचा परिषदेच्या कार्यकारी मंडळास आदेश दिला. ( यानुसार कार्यकारी मंडळाने १० जून १९५१ च्या सभेंत रीतसर आलेल्या अमळनेरच्या आमंत्रणाचा स्वीकार केला. ) अमळनेर येथील संमेलन आक्टोबर १९५२ मध्ये भरणार.

ठराव-अंमलबजावणी :—कारवार संमेलनांतलि ठरांव क्र. ८ नुसार 'भाषिक प्रदेशांच्या सीमानिश्चितीबाबत सर्वसामान्य तत्वें' ठरविण्यासाठी परिषदेने दि- ४, ५ ऑगस्टला एक महत्त्वाची सभा बोलाविली. गुजराथी, कन्नड, तेलगु, मल्याळम्, तामीळ व हिंदी या साहित्यसंस्थांना सभेंत सहकार्य करण्यासाठी आमंत्रिलें होतें. परंतु हिंदी, गुजराथी व कन्नड या संस्थांचेच प्रतिनिधि सभेसाठी आले. सभेंत पुढील प्रतिनिधींनी भाग घेतला. पं. जयचंद्र विद्यालंकार (हिंदी), श्री. यशवन्त शुक्ल (गुजराथ), श्री वरदराज आद्य (कन्नड), श्री जयदेवीबाअी लिगाडे, (कन्नड), म. म. प्रा. द. वा. पोतदार (म. सा. परिषद्), श्री. र. के. खाडिलकर (म. सा. परिषद्). साहाय्यक म्हणून श्री. ग. त्र्यं. माडखोलकर (विदर्भ साहित्य संघ), श्री. सावंत (वाङ्मयचर्चा मंडळ, बेळगांव) व श्री. घाणेकर (मराठवाडा साहित्य परिषद्) हे उपस्थित होते. भाषावार प्रांतरचनेबाबत सभेने दोन दिवस खेळीमेळीने विचारविनिमय केला व पुढील आशयाचें पत्रक सर्वानुमतें प्रसिद्ध केलें. 'भारतांतील सर्व घटकांत राष्ट्रीय अेकतेची खरीखुरी भावना निर्माण होण्यासाठी सर्व प्रांतांची भाषावार फेरविभागणी होणें जरूर आहे. भाषावार प्रांतरचनेनेच देशांतील खरेखुरे लोकशाहीवादी प्रवाह अेकत्र येऊन सुप्त वाङ्मयीन व सांस्कृतिक गुणांना योग्य तो विकास करण्याची संधि मिळेल.' सभेला आलेल्या परप्रांतीय विद्वान साहित्यिकांचा परिषदेच्या वतीने प्रकट सत्कार करण्यांत आला.

संमेलन ठराव क्र. २० नुसार 'महाराष्ट्रांतील कार्य करणाऱ्या, विविध साहित्य संस्थांचें दृढीकरण व अेकसूत्रीकरण' करण्यासाठी परिषदेने अेक प्राथमिक स्वरूपाची पोटसमिति नेमली व या समितीने म. म. प्रा. द. वा. पोतदारांच्या मार्गदर्शनाखाली दि. २९ जुलैस अेक योजना सादर केली. प्रस्तुत योजना विविध साहित्यसंस्थांकडे व परिषदेच्या शाखासभांकडे आणखी सूचना मागविण्यासाठीं पाठविण्यांत आली आहे. सर्वांकडून सूचना आल्यावर या बाबतींत पुढील कार्यव्यवस्था सुरू होईल.

स्मृतिदिनः— कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त शनिवार दि. २१।७।५१ रोजीं प्रा.श्री. म. माटे यांचें 'भौतिकशास्त्रें व धर्म यांचे यूरोपांतील संगर' या विषयावर व्याख्यान झालें.

व्याख्यानः— परिषदेच्या स्वाध्याय – व्याख्यान – मालेतर्फे रविवार दि. २ सप्टेंबरला डॉ. के. ना. वाटवे यांनी 'पंडितकवि' या विषयावर व्याख्यान दिलें.

प्राज्ञविशारद वर्गः— प्रतिवर्षाप्रमाणें प्राज्ञविशारद वर्ग १ जुलैपासून सुरू झाले. दोन्ही वर्गांत अनुक्रमें ७५ व ४० विद्यार्थी-विद्यार्थिनींची उपस्थिति असते. आतांपर्यंत प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. श्री. म. माटे, प्रा. श्री. के क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. रा. ना. गद्रे, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. प्र. न. जोशी, श्री. पु. सो. कान्त, प्रा. वा. दा. गोखले, यांनी अध्यापनकार्य केलें. श्री. के. नारायण काळे व श्री. बा. सी. मर्ढेकर यांनी अेकेक दिवस वर्गांत नाट्यविषयक व काव्यविषयक चर्चा केली.

विभाग साहित्य – संमेलनः— दि. २ । ९ । ५१ रोजीं कुर्डूवाडी विभाग साहित्य संमेलनाचा वर्षदिन साजरा झाला. या प्रसंगीं कुर्डूवाडी येथें वाङ्मय मंडळाची स्थापना, कवि कुंजविहारींचें काव्यगायन,' साहित्य आणि वाचनालयें' या विषयावरील चर्चा अित्यादी कार्यक्रम झाले.

अभिनंदनः—परिषदेचे सांगवी (पू. खा.) येथील कळकळीचे कार्यकर्ते श्री. वि. श्रा. चौधरी (साहित्य विशारद) यांना नि. भा. विद्यापीठ, आग्रा या संस्थेकडून 'हिंदी साहित्याचार्य' ही पदवी देण्यांत आली. या सन्मानाबद्दल श्री. चौधरी यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

अनुक्रमणिका

# साभार-स्वीकार

१ ग्रंथसंस्कार—ले. व प्रका. त्र्यं. दि. वाकनीस, ३।६ कुलाबा मिल प्लॉट्स, मुंबई ५; मूल्य १॥ रु.

२ शरत्प्रभा—ले. व प्रका. वि. अ. कुलकर्णी, गोगटे कॉलेज, रत्नागिरी; मूल्य १। रु.

३ चटके आणि गहिंवर—(कविता) ले. व प्रका. वि. ह. आपटे, अिंदूर; मूल्य २॥ रु.

४ आर्थिक घडामोडी—ले. ध. रा. गाडगीळ व नी. वि. सोवनी, प्रका. गोखले अर्थशास्त्र संशो. संस्था, पुणें ४; मूल्य ८ रु.

५ अंजलि—(वासंतिक अंक) संपा. ना. सी. फडके, मूल्य ३ रु.

६ किर्लोस्कर—(दिल्ली विशेषांक) संपा. शं. वा. किर्लोस्कर, मूल्य १ रु.

७ प्रवासी—(शालेय आवृत्ति) ले. ना. सी. फडके, प्रका. कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १। रु.

८ काळी ते गंगावळी—प्रका. मराठी वाङ्मय-मंडळ, कारवार; मूल्य २॥ रु.

९ कारवार—ले. आनंद नाडकर्णी, प्रका. मराठी वाङ्मयमंडळ, कारवार; मूल्य २॥ रु.

१० छिन्न-ध्वज—(कविता) —कवि शरद्, प्रका. अे. पी. चौगुले, वीरभारत प्रेस, बेळगांव; मूल्य २॥ रु.

११ कागदी घोडे-(प्रहसनें) ले. वि. मा. दी. पटवर्धन, प्रका. भारती प्रकाशन, ३६४ ठाकुरद्वार. मुंबई; मूल्य २। रु.

१२ चांफेकळ्या-(कविता) कवि. द. बा. चाफेकर, प्रका. सौ. अन्नपूर्णा चाफेकर, गदग; मूल्य २ रु.

१३ अन्तर्भेद—(अैति. कथाकाव्य) कवि व प्रका. बाळकृष्ण कोटणीस, बसवेश्वर गल्ली, बेळगांव; मूल्य २॥ रु.

१४ पुनरागमन—(नाटिका) ले. शि. दि. जोशी, विजय प्रका. सातारा; मूल्य १। रु.

१५ नवी मळवाट—(कविता) कवि शरच्चंद्र मुक्तिबोध, वीणा प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; मूल्य २॥ रु.

१६ संसारांतील अमृत—(कथा) ले. लक्ष्मणराव सरदेसाई, प्रका. ताडदेव बुकडेपो, मुंबई ७; मूल्य ३ रु.

१७ वातभीदार— नाटक) ले. प्र. श्री. कोल्हटकर, प्रका. मॉडर्न बुक डेपो, पुणें २; मूल्य १॥ रु.

१८ आणखी कांहीं कविता-बा. सी. मर्ढेकर, मौज प्रकाशन, मुंबई ४; १।। रु.

१९ गांवाकडच्या गोष्टी-व्यंकटेश माडगूळकर, मौज प्रकाशन, मुंबई ४; मूल्य ३।।। रु.

२० पाळण्यापासून शाळेपर्यंत-(लेखसंग्रह) प्रका. किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी, मूल्य ३ रु.

२१ विश्वमानव—(कविता) कवि ना ग. जोशी, प्रका. सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, टिळक रस्ता. पुणें २; मूल्य २। रु.

२२ स्नेहाचे झरे—(पत्रसंग्रह) ले. दादा धर्माधिकारी, प्रका. पां. रा. ढमढेरे, सदाशिव पुणें २; मूल्य २ रु.

२३ भूकवळी—(कथा) ले. सुरेश शर्मा प्रका. सुरस ग्रंथमाला, पढरपूर; मूल्य २ रु.

२४ शापित आणि अुःशापित—(कथा) ले. अिंदुमति शेवडे, नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; मूल्य २ रु.

२५ भारतभाव—( लेखसंग्रह ) ले. पु. पां. गोखले, प्रका. सौ. सुलोचना गोखले, कराड; मूल्य २ रु.

२६ मेघयन्ती—( कथा ) ले. व प्रका. आनंदीबाई जयवंत, दांड्याबाजार, बडोदें; मूल्य २॥ रु.

२७ द्विदल—( नाटिका ) ले. व. चिं. सहस्रबुद्धे, प्रका. व्हीनसबुकस्टॉल, पुणें २; मूल्य १० आणे.

२८ ज्ञान आणि मौजा—ले. वि. द. घाटे, प्रका. व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; मूल्य ८ आणे.

२९ नाजुक नवरा—(त्रोटक) ले. मा. कृ. शिंदे, प्रका. सौ. बचुबाई शिंदे, खोताची वाडी, मुंबई ४; मूल्य ॥=.

३० हिंदुस्थानांतील ब्रि. अंमल—ले. ग. सी. जोशी, प्रका. व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; मूल्य १। रु.

३१ उपेक्षितों की मनोगत—अनु. ग. र. वैशंपायन, प्रका. श्री. म. माटे, नातूबाग, पुणें २; मूल्य २॥ रु.

३२ वाङ्मयीन मूल्यें आणि जीवन-मूल्यें ले. गं. ब. ग्रामोपाध्ये, प्रका. व्हीनस बुक स्टॉल, पुणें, २; मूल्य २ रु.

३३ रम्यकथा—ले. अ. ह. लिमये, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; मूल्य २ रु.

३४ सावळाच रंग तुझा—(ललित-लघुनिबंध) ले. शांताराम, वीणा प्रकाशन, नागपूर १; मूल्य २॥ रु.

३५ भारतीय सोपपत्तिक शासनपद्धति—रा. वि. ओतूरकर, अ. वि. गृह प्रकाशन, सदाशिव, पुणें २; मूल्य १। रु.

३६ स्वर्गलोकचा बातमीदार—(पोवाडा) शाहीर द. ना. गव्हाणकर, प्रका. लोकसाहित्य, मुंबई २८; मूल्य ४ आणे.

३७ संगीत सौभद्र—कै. अण्णा किर्लोस्कर, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, ६२६ शनिवार, पुणें २; मूल्य १॥ रु.

३८ संगीत शारदा—कै. गो. ब. देवल, प्रका. कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, ६२६ शनिवार पुणें २; मूल्य २॥ रु.

३९ ते तीन दिवस—(प्रदीर्घ कथा) वसन्त देशपांडे, दीप प्रकाशन, परभणी; मूल्य १।।। रु.

४० छागल—( कथा )—बी. रघुनाथ, दीप प्रकाशन, परभणी; मूल्य २। रु.

४१ दीप—( साहित्य-संग्रह १ ) प्रका. दीप प्रकाशन. मराठवाडा साहित्य भांडार, परभणी; मूल्य १२ आणे.

४२ ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी-चर्चा—शं. गो. वाळिंबे, प्रका. मयूर अेजन्सी १७० रामबाग अिंदूर; मूल्य ३।। रु.

४३ सीता—स्वयंवर—( विठ्ठलकृत ) संपा. द. सी. पंगु, प्रका. स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य ४ रु.

४४ सरदार हरिसिंग नलुआ—ले. व प्रका. वि. वि. पेंडसे, ३१४ सदाशिव पुणें २; मूल्य १॥ रु.

४५ गुरुदेव अथवा शिक्षकोत्तम—ले. व प्रका. मु. गो. कुळकर्णी, नू. म. विद्यालय, पुणें २; मूल्य ३। रु.

४६ साहित्य आणि संशोधन—ले. र. म. भुसारी; प्रका. जोशी बंधू, गौळीगुडा, हैद्राबाद ( द ); मूल्य ३ रु.

४७ हळवें भिंग—(कविता) य. द. भावे, प्रका. मधुकर प्रि. प्रेस, बेळगांव; मूल्य १॥ रु.

४८ पदन्यास—( अेकांकिका ) प्रका. शारदोपासक मंडळ, ग्वाल्हेर, मूल्य २॥ रु.

४९ मराठी ग्रंथालयांचा अितिहास—संपा. व प्रका. ल. वा. पडोळे, पूजा प्रकाशन, धंतोली, नागपूर १; मूल्य ५ रु.

५० बायका ह्या अशाच—(नाट्यछटा) ले. प्रभाकर वेंद्रे, प्रका. पूजा प्रकाशन, नागपूर १; मूल्य १२ आणे.

५१ नवकाव्यसमीक्षा—स. वा. दीक्षित, प्रका. मनोहर ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य ८ आणे.

५२ शेजारच्या बाळांच्या गोष्टी—संग्रा. व प्रका. बा. मो. कानिटकर, C/o अिंटर नॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४; मूल्य १ रु.

५३ अर्धवर्तुळें—(कथा) प्रभाकर पाध्ये; प्रका. स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य २॥ रु.

५४ आंवट गोड—(कथा) अच्युत बर्वे, मनोहर ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य २ रु.

५५ लो. टिळक—दा. न. शिखरे, प्रका. के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य ८ आणे.

५६ आजच्या गोष्टी—के. नारखेडे, प्रका. लेखन वाचन भांडार, लक्ष्मी रोड, पुणें २; मूल्य ८ आणे.

५७ जगाचे प्रवासी—श्री. म. माटे, प्रका. लेखन वाचन भांडार, पुणें २; मूल्य १।रु.

५८ नवा निबंध—शिक्षक—ग. ल. ठोकळ व ग. द. माळी, लेखन वाचन भांडार, पुणें २; मूल्य २ रु.

५९ संस्कृति-समवाय—वत्सला भाटे, प्रका. लेखन वाचन भांडार, पुणें २; मूल्य २॥ रु.

६० मराठीची खात्री—श्री. म. माटे व शांता शेळके, लेखन वाचन भांडार; पुणें २; मूल्य ३ रु.

६१ कला-नीतिवाद—दु. का. संत व स. रा. गाडगीळ, प्रका. स्वाधीन साहित्य संस्था, १०१७ सदाशिव, पुणें २; मूल्य २ रु.

६२ मौखिक परीक्षा प्रश्नों की सूचि—ले. व प्रका. वि. श्रा. चौधरी, सांगवी (पू. खा.); मूल्य २ आणे.

६३ हिंदी भाषा और लिपी परिचय—ले. व प्रका. वि. श्रा. चौधरी, सांगवी (पू. खा.); मूल्य २ आणे.

६४ संसार-शोभा—(कथा) वसुंधरा पटवर्धन, प्रका. सौ. सुधा परचुरे, गोरेगांवकर चाळ क्र. २, मुंबअी ४; मूल्य २ रु.

६५ सुगंध—(कथा) ग. ल. ठोकळ, लेखन वाचन भांडार, पुणें २; मूल्य ३ रु.

६६ ज्ञानेश्वरी अध्याय १ ला—संपा. द. सी. पंगु, प्रका. स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य ३ रु.

६७ माधव जूलियन—(जीवन कथा) ले. व प्रका. गं. दे. खानोलकर, स्वास्तिक पब्लि. हाअुस, केळेवाडी, मुंबअी ४; रु. ५॥.

६८ पांढरा बाजार—(कथा) सदाशिव आठवले, प्रका. विजय प्रिं. प्रेस, बिंदू चौक, कोल्हापूर; मूल्य १॥। रु.

६९ भूसेवा—ले. व प्रका. ज. नि. पुरंदरे १०२६ चांदवडकर गल्ली, नाशिक; मूल्य २ रु.

७० मराठी लोकांची संस्कृति—अिरावती कर्वे, प्रका. देशमुख आणि कं. १९१ शनिवार, पुणें २; मूल्य ६ रु.

७१ कमरा नं. ९—(हास्यकथासंग्रह) अनुयोजक ज. ज. शिर्के, प्रका. गोमन्त प्रकाशन, मंडगांव; मूल्य १॥ रु.

७२ जरंड्याच्या डोंगरावर—(क्षेत्र-वर्णन्पर काव्य)-रंगनाथ, प्रका. अिंदिरा प्रकाशन, सदाशिव, पुणें २ मुल्य ४ आणे.

# कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर-सभागृहाचें उद्‌घाटन



महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर-सभागृहाचें उद्‌घाटन आणि कै. चिपळूणकर-तैल-चित्राचें अनावरण नामदार श्री. न. वि. गाडगीळ यांच्या हस्तें शनिवार दि. १९ मे, १९५१ रोजीं संध्याकाळीं ६॥ वाजतां मोठ्या थाटांत झालें. समारंभास लोकनायक अणे, नामदार दादासाहेब मावळंकर, सरदार माधवराव किबे अित्यादींनी शुभसंदेश पाठविले होते. उद्‌घाटनप्रसंगीं श्री. काकासाहेब गाडगीळ यांनीं पुढील शब्दांत कै. चिपळूणकरांना श्रद्धांजलि वाहिली. ' कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या विहंगमदृष्टीला हिंदुस्थान देश स्वतंत्र प्रजासत्ताक म्हणून नांदत असलेला दिसत असे. त्यांचें हें सुखस्वप्न आज प्रत्यक्षांत आलें आहे. आधुनिक मराठी भाषेचा पाया शास्त्रीबुवांनी घातला याबद्दल दुमत नाहीं.' समारंभास अध्यक्ष श्री. अ. का. प्रियोळकर, कार्याध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग, राजकवि यशवन्त, म. म. प्रा. द. वा. पोतदार, प्रा. न. र. फाटक, आचार्य जावडेकर, प्रा. श्री. म. माटे, श्री. वि. द. घाटे, रँग्लर परांजपे, परिषदेचे अनेक कार्यकर्ते, व अितर बराच जनसमूह उपस्थित होता.



---

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभावअखेर ) ले०— बा. अ. भिडे. ( प्रति शिल्लक नाहींत. )

२ महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास— ले० म. म. प्रा. द. वा. पोतदार मूल्य रु. ३ सभासदांस रु. १॥ ( ट. ख. निराळा ).

३ प्राचीन पत्रलेखें भाग १ व २ (प्राज्ञ परीक्षेस लावलेलें)– मूल्य रु. २।=.

४ वाङ्मयीन समालोचन (१९४७) मूल्य रु. २. सभासदांस रु. १॥.

५ शुद्धलेखन नियम—मूल्य १॥ आणा. (ट. ख. निराळा)

६ वाङ्मयीन-वाद (परिषद्-पुरस्कृत)– मूल्य रु. ३ सभासदांस रु.२८=.

७ संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति— ले. प्रा. गं. बा. सरदार, मूल्य २ रु. (सभासदांस १॥ रु.; ट. ख. वेगळा.)

[ कव्हर पान २ च्या पुढील मजकूर ]

३६ श्री. गजानन सखाराम वाके, पुणें २
३७ श्री. रामकृष्ण वासुदेव टिळक, सांगली
३८ श्री. नारायण वासुदेव गद्रे, सांगली
३९ श्री. माधव व्यंकटेश मंगसुळीकर, सांगली
४० श्री. गणेश रघुनाथ अिनामदार, सांगली
४१ श्री. विनायक चिंतामण केळकर, सांगली
४२ श्री. महादेव भिमाजी कुलकर्णी, सांगली
४३ श्री. माधव निळकंठ पुरंदरे, पुणें २
४४ श्री. सावळाराम बाळाजी कुवल, मुंबअी १६
४५ प्रा. संभाजी गोविंदराव टिकम, धारवाड
४६ श्री. काशिनाथ वासुदेवराव कुवल, मुंबअी १२
४७ श्री. लक्ष्मण बारलुजी पडोळे, नागपूर १
४८ श्री. पांडुरंग रघुनाथ नाडगोडा, अहमदनगर
४९ श्री. पांडुरंग विष्णु कुलकर्णी, सातारा
५० श्री. मधुकर यशवंत वैद्य, मुंबअी ४
५१ श्री. वसंत बाळकृष्ण तोरस्कर, मुंबअी १८
५२ श्री. पांडुरंग तुकाराम कांदळगांवकर, मुंबअी १२
५३ श्री. आत्माराम दशरथ कुवल, मुंबअी १८
५४ श्री. विठ्ठल नारायण ठकार, पुणें २
५५ श्री. श्रीकृष्ण विष्णु भट, पुणें २
५६ श्री. नारायण श्रीनिवास कुलकर्णी, वेळगांव
५७ श्री. शकुन्तला बापट, विटें ( दक्षिण सातारा )
५८ श्री. ल. सो. गाडवे, पुणें २
५९ श्री. वासुदेव सीताराम वैद्रे, पुणें ४
६० श्री. पु. के. दत्तवाडकर, माधवनगर ( द. सातारा )
६१ श्री. शं. ब. सुखटणकर, अष्टे ( द. सातारा )

# शुद्धि-पत्र

पहिल्या डॉ. तुळपुळे यांच्या लेखांत राहिलेलीं पुढील अशुद्धें नीट करून घ्यावीं.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पृ. ४ | ओळ | ३ | | खोळेश्वर | ऐवजी | खोलेश्वर वाचावें. |
| पृ. ६ | ओळ | १२ | | महाग्रंथांसून | ऐवजी | गद्यग्रंथांतून ,, |
| पृ. ७ | ओळ | १ | | संवत्सरांतग्गंत | ,, | संवत्सरांतर्गत ,, |
| पृ. ८ | ओळ | ३ | टीप १५ | भावाने | ऐवजी | मापाने ,, |

---

मुद्रकः— मधुकर नारायण चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, लि०,
१९८/१७, सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.
प्रकाशकः— वा. द्वा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.